# गुरुनाथ नाईक

# चामुंडेच्या देवळांत






कादंबरी क्रमांक
एकशे चौपन्न
गोळंदाज कथा क्रमांक एकतीस



# चामुंडेच्या देवळात



गुरुनाथ नाईक





गुरुनाथ प्रकाशन, पुणे

प्रकाशक ।
**गुरुनाथ प्रकाशन**
४४०।अ, बुधवार पेठ, पासोड्या विठोबाजवळ,
प्रार्थना समाज बोळ, पुणे २.



प्रथमावृत्ती : आक्टोबर १९७३ ☆ 

मूल्य : **दोन रुपये**



मुद्रक ।
**अविनाश केळकर**
प्रिंट आर्ट,
८८५, भांडारकर इन्स्टिटयूट रोड,
पुणे ४.



# एक

लख्ख चांदणी प्रकाशात दोन घोडेस्वारानी चंबळेचे पात्र ओलांडले आणि सवाई माधवपूरच्या रोखाने ते दौडू लागले. सूर्यास्त झाल्यापासून तो मध्यरात्र होईपर्यंत दोघानीही भरपूर विश्रांती घेतली होती.

त्यामुळे चंबळेचे पात्र ओलांडताना आणि एका चालीने दौड करताना दोघेही ताजेतवाने वाटत होते. त्यांचे घोडेही दमदारपणे दौडत होते.

उदयसिंह चौहान आणि हरिहर पाली हे दोघेही बऱ्याच दिवसानी एकत्र आले होते, आणि पटणीला जाण्यासाठी निघाले होते.

पहाटेच्या सुमारास सवाई माधवपूरला दक्षिणेकडून वळसा घालून ते तसेच पुढे सरकले. आणि पटणीच्या सीमेवर येताच बकल्यासारखे झाले. रात्री काहीतरी गडबड झालेली आहे, याच

दोघानाही कल्पना आली. रक्ताच्या थारोळ्यात दोन घोडे सीमेवरच पडले होते. बंदूकीच्या गोळ्या आणि बाण त्यांच्या शरीरात शिरलेले दिसत होते.

घाबरण्याचे उदयसिंह चौहानाला कोणतेही कारण नव्हते अशा घटना चंबळेच्या खोऱ्यांत नित्यनियमाने घडताना आजवर ते पहात आले होते.

दोघेही पटणी गावात शिरले. म्हणजे त्या गावात शिरण्याचे त्याना कोणतेही कारण नव्हते. त्या गावाला वळसा घालून ते थेट डॉक्टर रामपाल तिवारींच्या घरी जाणार होते. आणि जाता जाताच भैय्या खानावळवाल्याला फक्त भेटणार होते.

पण ठार झालेले दोन घोडे पहाताच दोघांचेही कुतूहल जागृत झाले होते. संपूर्ण पटणी गाव त्यांच्या ओळखीचा होता. त्या गावा-वर एकादे संकट आले असेल, तर ते दूर करण्याची जबाबदारी उदयसिंह चौहानाची होती.

दोन्ही घोडेस्वार गावात शिरले. काही बायका आणि काही मुले आपल्याला पाहुन घरात का पळाली हेच त्या दोघांच्याही लक्षात आले नाही.

पण लगेच त्याना ओळखणारी काही माणसे धावत आली. ऐसपैस पसरलेल्या त्या गावात उदयसिंह चौहान आल्याची वार्ता वाऱ्यासारखी फैलावली.

'रात्री काय झालं?' उदयने जवळ येऊन थांबलेल्या म्हाताऱ्याला जोरात विचारले.

'महाराज, रात्री दरोडेखोर शिरले होते. त्यानी ही कत्तल केली. आमचे आठ तरुण त्यानी ठार केले.' त्या म्हाताऱ्याने थर-थरल्या आवाजात सांगितले, आणि आपला तर्क खरा आहे, याची जाणीव उदयला झाली. त्याने बराच वेळ एक प्रश्न देखील त्या म्हाताऱ्याला विचारला नाही. कारण विचारण्यासारखे काहीच

शिल्लक नव्हते.

बरेच दिवस दरोडेखोरांचा धुमाकूळ त्याच्या कानात शिरला नव्हता. चंबळेच्या खोऱ्यातील दरोडेखोर नेस्तनाबूत झाले असे समजायला तो तयार नव्हता. एकाद्या दरोडेखोराने गावावर दरोडा घातला तर कत्तल होणार नाही, हे देखील मानायची त्याची तयारी नव्हती.

बराच वेळ ज्या ज्या ठिकाणी चकमकी झाल्या आणि ज्या ज्या ठिकाणी प्रेते पडली होती, त्या त्या ठिकाणी दोघानीही फिरून पहाणी केली. अत्यंत अमानुषपणें ती कत्तल झाली होती. उदयसिंह चौहानासारख्या माणसाच्या मनावर देखील फार मोठा आघात झाला होता.

बोलता बोलता उदयने त्या म्हाताऱ्याला बाजूला नेले. गावात त्या म्हाताऱ्याचा दराराही फार मोठा. त्याच्या शब्दावर ते गाव हलत होते. तो म्हणेल ते घडत होते. आणि तो अत्यंत हुशार आहे, हे देखील उदयला माहित होते.

'ठाकूर, रात्री दरोडेखोर केव्हा आले होते ?' उदयने सौम्य आवाजात विचारले.

'मध्यरात्र उलटताच.'

'या गावात त्याना दरोडा घालण्यासारखं काय सापडलं ?'

'म्हणूनच तर आमचा गोंधळ उडाला. दरोडेखोरानी कुठेही दरोडा घातलेला नाही, उलट प्रत्येक प्रेताजवळ दरोडेखोरानी पैशांची एकेक थैली टाकलेली होती.' त्या म्हाताऱ्याने सांगितले. तो गोंधळलेला आहे, हे स्पष्ट दिसत होते.

उदयचाही चेहरा विचारमग्न झाला. इतके हत्याकांड घडवून देखील दरोडेखोरानी दरोडा घातला नाही, ही घटना निश्चित विचार करायला लावणारी होती.

हरिहर पाली आणि उदयसिंह चौहान वेड्यासारखे एक-

मेकांच्या तोंडाकडे पहात होते. या घटनेचा अर्थच त्यांच्या लक्षात येत नव्हता.

त्याचवेळी त्यांचे लक्ष एका म्हाताऱ्या स्त्रीने वेधून घेतले. ओरडत ती त्यांच्या रोखाने धावत येत होती.

'बोंबलायला काय झालं ?' गावच्या त्या म्हाताऱ्या पुढाऱ्याने ओरडूनच विचारले. उदयसिंह समोर शेळीसारखा वागणारा म्हातारा ठाकूर इतर गावकऱ्यांशी मात्र वाघासारखा वागत होता. एकाएकी त्याचा चेहरा कठोर बनला होता.

'महाराज, रात्रीपासून माझी सून नाही.'

'कुठं गेली ?'

'माहित नाही महाराज.'

'मग इतका वेळ तू काय करीत होतीस ?' ठाकूर तिच्यावर डाफरला. आणि ती अधिकच घाबरल्यासारखी झाली. दयेच्या याचनेने ती उदयसिंह चौहान आणि हरिहर पाली या दोघांकडे पाहू लागली.

'महाराज, गरीबावर दया करा. निदान माझ्या नातवंडा-साठी तरी तिचा शोध करा.' ती गयावया करीत बोलत होती. शक्तीहीन बनलेल्या त्या म्हातारीची कातडी अक्षरशः लोंबत होती. सुरकुतलेल्या चेहऱ्यावर डोळयातील अश्रू आडवे तिडवे गळत होते. आणि त्याच अश्रूंनी उदयसिंह चौहानाचे लक्ष खेचून घेतले होते. तिच्यासाठी काहीतरी आपल्याला करायला हवे, हाच विचार त्याच्या डोक्यात सारखा घोळत होता.

त्या म्हातारीचा एकुलता एक मुलगा दोन वर्षापूर्वीच दरोडे-खोरांशी झालेल्या चकमकीत ठार झाला होता. आणि तेव्हापासून ती म्हातारी आणि तिची सून कुणाच्याही शेतात काबाडकष्ट करून मुलाच्या कच्च्याबच्च्याना जगवीत होती.

आणि एकाएकी सून नाहीशी होताच तिचा उरला सुरला

धीर नाहीसा झाला होता. जणुकाही तिच्यावर आकाशच कोसळले होते.

'ठाकूर, ही तिच्याशी बोलण्याची पद्धत नव्हे.' एकाएकी उदयसिंह चौहान कठोर बनला. रागाने तो ठाकुराकडे पहात होता. उदयच्या चेहऱ्याकडे पहाताच ठाकुराचा चढलेला पारा खरर्कन् उतरला होता.

'महाराज, ही म्हातारी बाई...'

'ठाकूर, ते मी पाहीन. तिला मदत करणे तुमच्या हातात असेल तर जरुर करा आणि नसेल तर वाड्यात जाऊन बसा.' उदयचा आवाज पूर्वीपेक्षाही अधिक चढला. आजुबाजूला जमलेल्या गावकऱ्यांना देखील या प्रकाराने धक्का बसला होता.

उदयने त्या म्हातारीला जवळ बोलावले.

'काय घडलं ते मला सांग.' उदयने अत्यंत सौम्य आवाजात तिला विचारले. आणि कृतज्ञतेच्या भावनेने त्या म्हातारीने उदयकडे पाहिले. तिच्या डोळ्यांतील अश्रुंना आता बांध फुटला होता. आपल्यासाठी देवच धावून आलेला आहे, असे तिला झाले होते.

थरथरत्या आवाजात तिने सांगायला सुरुवात केली. ती सांगत असताना उदयने एक देखील प्रश्न विचारला नव्हता.

'ती घरात नाही, हे तुला केंव्हा समजलं?' तिचे बोलणे संपताच उदयने सुरुवात केली.

'रात्रीच्या गडबडीत काय झालं तेच आम्हाला समजलं नाही. दोन-तीन दरोडेखोर आमच्या घरात शिरले होते. घरात काही नाही हे पहातच ते निघून गेले.' म्हातारी थरथरल्या आवाजात सांगत होती.

'दरोडेखोर निघून गेल्यानंतर तू तिला पाहिलं होतंस?'

'नाही, महाराज,'

'मग सकाळीच तू का नाही सांगितलंस याना?' उदयने तिला

सौम्य आवाजातच दटावले.

'मला वाटलं ती घाबरून कुठेतरी दडली असेल.'

उदय गप्प झाला. त्याच्या डोळ्यांपुढे काल्पनिक प्रसंग उभे राहू लागले. कदाचित तिला दरोडेखोरानी पळवून नेण्याची शक्यता निर्माण झाली. जर ती घाबरली असेल, तरी सूर्य माथ्यावर येईपर्यंत कुठेही थांबणार नाही, हेच मनाला पटवण्याचा तो प्रयत्न करीत होता.

'आता तू घरी जा, आणि मुलांकडे लक्ष दे. तुझ्या सूनेकडे मी लक्ष देईन.' उदयसिंह चौहानाने ठाम विश्वासाने तिला आश्वासन दिले. आणि कृतज्ञतेच्या भरात ती त्याचे पाय धरण्यासाठी वाकली.

उदयच्या काळजात कुठोतरी चरकले. तिचे दोन्ही हात धरून तिला उभे केले. आपला एकुलता एक आधार नाहीसा झालेली ती म्हातारी रडतच तिथून निघून गेली. तिच्या अश्रूंचा पूर थोपवण्याचे सामर्थ्य त्यावेळी कुणाच्याही हातात नव्हते.

पण त्या म्हातारीच्या सुनेला ज्याने हात लावलेला आहे, तो मुळातून तोडण्याचा निश्चय उदयने मनातल्या मनात केला होता. हळुहळू त्याची नजर कठोर बनन चालली होती.

+ + +

धोलासिंग पवनार हा अत्यंत क्रूर डाकू अशी त्याची ख्याती होती. पण आतापर्यंत कटाक्षाने आपले नाव दडवण्यात त्याने यश मिळवले होते. जिथे जिथे त्याने दरोडे घातले तिथे तिथे त्याच्या नावाचा मागमूसदेखील कुणाला लागला नव्हता.

त्याचा आपल्या दैवतावर अतिशय विश्वास होता. देवाचा कौल घेतल्याशिवाय कोणत्याही कामगिरीला कधीही तो सुरुवात करीत नसे.

चामुंडेश्वराचे मंदीर त्यानेच उभारले होते. दरोड्यातला भरपूर पैसा त्याने तिथे ओतला होता. एका गरीब ब्राह्मणाची

गरिबी देखील हा हा म्हणता नष्ट करून टाकली होती.

अत्यंत महत्वाचा असा दरोडा घालताना नरबळी देण्याची प्रथा त्याने पाडली होती. नरबळीच्या विरूद्ध असलेला तो ब्राह्मण आता नरबळी देण्यात देखील तरबेज झाला होता.

धोर्लसिगाचे आणखी एक वैशिष्ट होते. चामुंडेश्वराला बळी देण्यासाठी जी सुंदर स्त्री तो पळवून आणीत असे ती देखील दरोडा घालूनच. आपल्या देवाला आपण अतिशय खूष ठेवलेलं आहे, आणि तो आपल्याला कधीही अपयश येऊ देणार नाही, या भावनेवर त्याची निष्ठा होती.

शेट अजमेरवर भयानक दरोडा घालण्याचा विचार त्याने केला होता. इतका मोठा आणि धोकेबाज दरोडा घालताना भरपूर सावधगिरी बाळगण्याचा त्याचा विचार होता. आणि आपल्या देवाला जास्तीत जास्त खूष करण्याचाही निश्चय त्याने केला होता. आपल्याला यश दे, पाच सुंदर स्त्रियांचे बळी देईन, असे त्याने चामुंडेश्वराला सांगून घेतले होते.

आणि त्यासाठीच दरोडा घालण्यापूर्वी बळी देण्यासाठी पाच स्त्रिया जमवणे त्याला भाग होते, आणि त्याही दरोडे घालूनच.

बळी देण्यासाठी लागणाऱ्या स्त्रीसाठी पहिलाच दरोडा त्याने पटणीवर घालविण्याची योजना आखली आणि चांदणी रात्र पाहून त्याने दरोड्यासाठी कूच केले. पटणीच्याच पूर्वेला अत्यंत अवघड अशा जागी त्याचा तळ होता. त्या तळावरून नऊ ते दहा कोसावर पटणी हे गाव होते. मध्यरात्रीच्या सुमारास त्याने सरळ सरळ पटणी-वर हल्ला केला

त्या गावची बरीच माहिती धोर्लसिगाला होती. आपल्याला विरोध करणारे कुणीही त्या गावात नाहीत, याची त्याला खात्री होती. आदल्या दिवशी कोणत्या घरातील स्त्री पळवायची याची पहाणी त्याच्या खास हेराने केली होती.

सर्वजण आत शिरताच गाव खळबळले. इतर ठिकाणी त्याल जो अनुभव आला होता तो या ठिकाणी देखील आला. आरडाओरडा-करीत ते गावाच्या चावडी पर्यंत आले तरी त्याना विरोध झाला नव्हता.

सर्व घोडेस्वारांचा मोर्चा, हेरुन ठेवलेल्या स्त्रीच्या घराकडे वळला आणि एकाएकी दहाबारा तरुणांचा जमाव विरोध करण्या-साठी पुढे सरसावला.

धोलसिंगाला त्याचे काहीही वाटले नाही. मनातल्या मनात तो हसला. रक्तकांड घडल्याशिवाय दरोड्यात मजा नाही, असे त्याला वाटायचे. विरोध झाला नाही हे पहाताच तो थोडासा निराश बनला होता. आणि विरोध होतो, आहे, हे पहाताच खूष होऊन गेला.

ओरडूनच त्याने त्या तरुणावर हल्ला करण्याचा हुकूम सोडला. एकाएकी गोळीबारांचे आवाज शांत वातावरण भेदून गेलं. पटणीच्या तरुणानी बंदुकीच्या गोळ्या आणि बाण यांचा मारा दरोडेखोरांच्या टोळीवर केला होता. दोन दरोडेखोर जखमी झाले होते.

घोलासिग सावध झाला. चारपाच माणसे घेऊन तो बाजूला झाला घोडे फेकीत ते चौघेही त्या स्त्रीच्या घराजवळ आले. दार फोडून ते आत शिरले. त्या मुलांची आरडा ओरड सुरु झाली होती.

ज्या स्त्रीसाठी ते आले होते ती स्त्री दोन मुलाना घेवून घराबाहेर पळताना धोलसिगने पाहिली. आणि मंद उजेडात त्याने आपल्या सहकाऱ्यांना इशारा केला.

धोलासिगने धावणाऱ्या त्या तरुणीला लगेच गाठले. ओरड-लीस तर मुलाना कापून काढीन अशी धमकी तिला दिली. मुलाना घराजवळ सोडून दरोडेखोरांच्या हुकूमाप्रमाणे ती स्त्री दरोडेखोरां-जवळ परत आली. तिला उचलून एका घोड्यावर बसवण्यात आले, तेव्हा तिच्या तोंडून एक शब्द देखील बाहेर पडला नव्हता.

आपले काम होताच ते दरोडेखोर ओरडत निघाले. धोलासिग

ओरडून आपल्या सहकाऱ्यांना मागे फिरण्याचा संदेश देत होता. आणि स्वतः जीव तोडून दौडत होता. पण कुठेतरी चुकले होते.

गावच्या सिमेवर येताच त्याना प्रखर अशा प्रतिकाराला तोंड द्यावे लागले. झाडा झुडपातून त्याच्यावर एकाएकी गोळ्या आणि बाणांचा पाऊस पडू लागला. धोलसिंग चिडला. त्याचा संयम संपला मागे वळून त्याने तुफान मारा करण्याचा हुकूम सोडला. आणि गोळीबार थंड होताच आपल्या दोन सहकाऱ्यांची प्रेते घेऊन तो निघाला, या दरोड्यात त्याने दोन अव्वल दर्जाचे घोडे, अत्यंत शूर असे दोन सहकारी त्याने गमावले होते.

पण थोड्याच वेळात मनातील दुःख तो विसरला होता. एक स्त्री त्याने मिळवली होती. आणखी चार स्त्रिया मिळवण्यासाठी त्याला दरोडे घालणे भाग होते.

त्याच दरोड्यांचा विचार आता त्याच्या डोक्यात घोळत होता.





## दोन

सूर्य पश्चिमेकडे झुकला आणि उदयसिंह चौहान भैयाच्या खानावळीजवळ आला. त्याच्याबरोबर हरिहर पाली देखील होता.

उदयला दारात घोडा बांधताना पहाताच म्हातारा भैय्या धावतच दारात आला. इतक्या दिवसानी आलेला चौहान आपल्याला ख्यालीखुशाली विचारील अशी त्याची अपेक्षा होती, पण उदयचा उतरलेला चेहरा पहाताच त्याचाही चेहरा खरंकन उतरला.

'चौहान, झालं काय ?' भैय्या आश्चर्याने बोलला. पटणीत आल्या आल्या चौहानाचा चेहरा उतरलेला तो प्रथमच पहात होता.

'भैय्या, या भागात एखादा नवीन दरोडेखोर आलेला आहे काय ?' भैय्याबरोबर आत जात उदयने विचारले.

'असं मी फक्त ऐकतो. पण निदान माझी तरी खात्री झालेली नाही.' भैय्याने सांगितले. वाटेत येताना काहीतरी घडलेले आहे

याची खात्री त्याला झाली होती.

दोघेही एका बाकड्यावर बसले. आपण जे केवळ ऐकत होतो, ते दरोडेखोरांच्या बाबतीत खरे आहे, याची जाणीव भैय्याला हळु हळू होऊ लागली.

उदय तर गंभीरच होता.त्याच्या डोक्यातील विचारांचे वादळ अजून शमले नव्हते. हळुहळु त्याच्या तोंडातून एकेक वाक्य बाहेर पडू लागले. आपल्यापासून एक कोसावर असलेल्या दरोड्याविषयी आपल्याला कळू नये याचेच भय्याला आश्चर्य होते. कान देऊन तो उदयचे बोलणे ऐकत होता.

'भय्या, त्या म्हातारीसाठी तरी मला त्या दरोडेखोराला गाठायला हवं.' उदय गंभीर आवाजात बोलला.

बरात्र अंधार झाल्यानंतर तो भय्याच्या खानावळीतून बाहेर पडला. दोन्ही घोडे अंधार कापीत डॉ. तिवारींच्या बंगल्याकडे चालले होते. उदयचे चढलेले डोके हळुहळू शांत होऊ लागले होते, आणि त्याच्या डोळ्यापुढे रत्नाची मूर्ती फिरू लागली होती. बऱ्याच दिवसानी तो तिवारींच्या घरी येत होता.

डॉ. रामपाल तिवारींशी त्याचे कोणतेही सोयर सुतक नव्हते. त्याचे आकर्षण होते ते फक्त रत्ना.

दोन्ही घोडे डॉ. तिवारींच्या बंगल्यासमोर उभे राहिले. त्यावेळी पिठासारखे चांदणे पसरले होते. त्या चांदण्यांतून आपल्या बंगल्याकडे येणाऱ्या दोन व्यक्ती रत्ना किंवा तिवारींनी पाहिल्या असाव्या आणि त्याना ओळखले देखील असावे.

कारण, दोघेही घोड्यावरून खाली उतरताच अचानक दार उघडले गेले होते. आणि डॉ. तिवारी घाईघाईत बाहेर आले होते. पायच्या चढणाऱ्या उदयला पहाताच रत्नाचा चेहरा उजळून निघाला होता.

उदयच्या चेहऱ्यात देखील कमालीचा बदल झाला होता.

पटणी गावावरचा दरोडा तो पार विसरून गेला होता.

उदयसिंह आणि हरिहर पाली खास कामगिरीसाठी रामपाल तिवारीकडे आले होते. उदयचे लग्न झाले तर ते रत्नाशीच होईल, हे जगजाहीर असले तरी उदयसिंह चौहानाकडून अधिकृतपणे तिवारीच्या मुलीला मागणी घातली गेली नव्हती. आता तेच काम करायला हरिहर पाली आला होता. आणि बळजबरीनेच त्याने उदयला बरोबर आणले होते.

बऱ्याच दिवसानी भेट झाल्यामुळे बोलण्यावर बोलणें वाढत गेले होते. भरल्यापोटी जेवत बसलेले चौघेही मध्यरात्र उलटली तरी जाग्यावरचे हलले नव्हते. उदयसिंह चौहानाला पटणीतील म्हातारीचा पूर्णपणे विसर पडला.

एकाएकी झटका आल्यासारखा उदयसिंह चौहान उठून उभा राहिला. त्याने कान टवकारले होते. कसला तरी आवाजाचा अंदाज तो घेत होता. अस्पष्ट असे घोड्यांच्या टापांचे आवाज त्याच्या कानात शिरत होते.

उदयसिंह चौहानाला ती सवयच झाली होती. अवेळी असे काही घडले म्हणजे तो त्या घटनेकडे संशयानेच पहात होता.

आताही तसेच झाले. भरधाव धावणाऱ्या घोड्यांच्या टापांचे आवाज ऐकून त्याच्या मनातील संशय जागृत झाला. घोडा जवळ जवळ येत होता. टापांचे आवाज जवळ जवळ येत होते. हास्य-विनोदात रंगलेला उदयसिंह चौहानाचा चेहरा बदलत चालला होता. डोळ्यांत कठोर भाव नाचू लागले होते. सावकाश तो कमरेवर हात ठेवून बंगल्याच्या दारात येऊन उभा राहिला. शुभ्र चांदण्यात त्याला बंगल्याच्या रोखाने येणारा घोडेस्वार स्पष्ट दिसत होता.

दारात येऊन थांबलेल्या घोडेस्वाराला उदयने पहाता क्षणीच ओळखले. तो भैय्याचा रक्षक होता. आणि आता त्याचा चेहरा पार बदललेला दिसत होता. त्याच्या चेहऱ्यावरची भीती पाहूनच काही-

तरी घडलेलं आहे, हे उदयच्या लक्षात आले.

'महाराज, ताबडतोब चला. खानावळीवर दरोडेखोरानी हल्ला केलेला आहे.' भैय्याचा तो नोकर थरथरल्या आवाजात बोलून गेला.

उदयसिंह चौहाला तेवढेच पुरे होते. नाहीतरी दरोडेखोराना गाठण्याचा त्याने निश्चय केलाच होता. त्याना कुठे गाठायचे हाच प्रश्न आतापर्यंत त्याला भेडसावीत होता. आणि अचानक दरोडे-खोरांचे नाव निघताच तो खूष होऊन गेला होता. त्याने झटक्यात आत ठेवलेले घोडयावरचे खोगीर उचलले. हरिहर पालीला तर काही सांगण्याचीच गरज नव्हती. हां हां म्हणता तिन्ही घोडेस्वार तुफान वेगाने दौडत खानावळीच्या रोखाने निघाले होते.

'किती आहेत ?' उदयसिंहाने भैय्याच्या माणसाना विचारले.

'दहा बारा तरी असतील महाराज.' त्याला उत्तर मिळाले,

उदयसिंह चौहानाच्या दृष्टीने दहाबारा दरोडेखोर म्हणजे काही फार नव्हते. हां हां म्हणता तो फडशा पाडू शकत होता.

पटणी गावावर ज्यानी रात्री दरोडा घातला, त्यानीच आताही भैय्या पाटलाच्या खानावळीवर दरोडा घातलेला आहे, हे उदयने ओळखले होते. दरोडेखोराना गाठण्याची संधी इतकी लवकर येईल याची कल्पना उदयला आली नव्हती. तो जितका चिडला होता तितकाच उत्साही बनला होता.

उदयने थोडेसे अंतर कापले आणि गोळीबाराचा आवाज त्याच्या कानात शिरला. अस्पष्टपणे ऐकू येणारा गोळयांचा आवाज आता हळूहळू वाढत चालला होता. आपण अगदी योग्यवेळी धावून आलो आहोत याची जाणीव उदयला झाली. त्याने घोडयाला आणखीनच टाच मारली. पूर्वीपेक्षाही वेगाने तिन्ही घोडे खानाव-ळीच्या रोखाने दौडू लागले.

जेव्हा ते खानावळीपासून काही अंतरावर थांबले, तेव्हा दरोडे-

खोरानी भैय्याच्या खानावळीला घेरलेले आहे, याची कल्पना उदयला लगेच आली. हरिहर पालीला काही सांगायची जरुरी नव्हती. एका-एकी त्याने घोड्यावरुन उडी घेतली होती. आणि घोड्याला मागच्या मागे पिटाळले. त्याने अचुक गोळीबाराला सुरुवात केली. खानावळी-वर हल्ला झालेला आहे, हे पाहून हरिहर अतिशय चिडला होता. उदसिंह चौहानाचीही तीच अवस्था झाली होती. पण त्याने हरिहर-सारखी घाई केली नव्हती. तसाच घोडा मागे फेकून तो गोळीबार करणाऱ्या दरोडेखोरांच्या पिछाडीला गेला होता.

एखादा दरोडेखोर जिवंत सापडत असला तर त्याला पकडायचा होता. आणि तो केवळ पिस्तुलाचाच उपयोग करणार असल्यामुळे दरोडेखोरांच्या अगदी जवळ जाणे त्याला भाग होते.

पण वेगळेच चित्र त्याला दिसून आले. पलिकडच्या बाजूने दरोडेखोर पळून जाताना त्यानी पाहिले. एकदम त्यांचा पाठलाग करणे देखील धोक्याचे होते.

उदय विचार करीत जागच्या जागी थबकला. थोडा वेळ थांबून त्याने घोडा खानावळीच्या दारात नेऊन उभा केला. तो घोड्यावरुन खाली उतरतो न उतरतो तोच हरिहर पाली देखील घोडा घेऊन आला होता.

' चौहान, मी दोघाना आडव केल ' घोड्यावरुन खाली उडी घेत हरिहरने शांतपणे सांगितले. आपण दोघाना आडवे केले, याचे त्याला फारसे काही वाटत नव्हते.

भय्याच्या माणसानी दोन प्रेते ओढीत आणली. मशालींच्या उजेडात उदयने तीं न्याहाळून पाहिली. पण कोणताही अर्थबोध त्याला त्या प्रेतावरून झाला नाही. भय्या किंवा भय्याचा एकही माणूस त्याना ओळखत नव्हता.

कोंबड्याने जोरदार बांग दिली आणि उदय हरिहरला घेऊन तिथून निघाला. आता त्या ठिकाणी त्यांचे कोणतेही काम नव्हते.

दरोडेखोराना थोपवण्यात भय्याने बरेच चातुर्य दाखवले होते. भय्याची मुलगी आणि म्हातारी बायकोदेखील गोळीबार करते, हे उदयच्या दृष्टीने आश्चर्य होते. आणि यापूर्वी असे घडलेले, उदयने तरी पाहिले नव्हते.

संथपणे त्यांचे घोडे तिवारींच्या बंगल्याच्या रोखाने दौडत होते. बंगल्याकडे जाण्याची कोणतीही घाई त्याना नव्हती.

दोघेही रामपाल तिवारींच्या बंगल्याजवळ आले. आपल्या घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकून तिवारी आणि रत्ना बाहेर येतील अशी त्यांची कल्पना होती. पण तसे काहीच घडले नाही, दार बंदच होते.

एकदम उदय घोड्यावरून खाली उतरला नाही. एक वेगळाच संशय त्याच्या मनात उभा राहिला. भय्याच्या खानावळीवर दरोडा पडला, हे ऐकून दोघानाही झोप येणे शक्य नाही, याची खात्री उदयला होती. आणि तरीही ते झोपले असतील, हे मानायला परोपरीने सांगून देखील त्याचे मन तयार झाले नाही.

सावकाश तो खाली उतरला. दाराकडे त्याने एकवार नजर टाकली. आणि दार किंचित किलकिले आहे, याची कल्पना त्याला आली. सावकाश त्याने दार उघडले आणि एकाएकी त्याचे रक्त तापून निघाले.

मशालीच्या उजेडात त्याने रामपाल तिवारीना पाहिले. ते रक्ताच्या थारोळ्यात पडले होते. त्यांच्या हातातील बंदुक डोक्या–जवळ पडली होती. या घटनेची त्याने कधीही अपेक्षा केली नव्हती. रामपाल तिवारी सहजासहजी दरोडेखोराना बळी पडतील हे त्याला स्वप्नातही खरे वाटणे शक्य नव्हते.

पण आता ते घडले होते.

उदयसिंह चौहान भानावर आला. घाईघाईत त्याने रत्नाच्या

खोलीत प्रवेश केला. खोलीत बरीच उलथापालथ झाली होती. कुणाचीतरी बरीच झटापट झालेली आहे, हे स्पष्ट दिसत होते.

संपूर्ण बगला त्याने धुंडाळून काढला. पण रत्ना काही त्याला दिसली नाही. त्याचे डोके चढल्यासारखे झाले. भणाणलेल्या अवस्थेत तो दारात येऊन उभा राहिला. खाली पडलेले तिवारी जिवत आहेत, का मेले, हे पाहण्याचे भान देखील त्याला राहिले नाही.

पण त्याचे काम हरिहर पालीने पुरे केले. आणि झटक्यात ओरडून त्याने उदयला हाक मारली. त्याचा आवाज उत्तेजित बनल्यासारखा वाटत होता.

'काय ?' उदयने शुष्कपणे विचारले. त्याने मागे वळून देखील पाहिले नव्हते.

'चौहान, तिवारी जिवंत आहेत.' हरिहर पालीने घाईघाईत सांगितले. आणि बाहेर पायऱ्यावर उभा असलेला उदय भानावर आला. घाईघाईत त्याने आत येऊन तिवारीना चाचपून पाहिले.

'हरिहर, ताबडतोब भैय्याला बोलावून आण.' उदयच्या तोंडून कसेबसे शब्द बाहेर पडले. आणि धावत बाहेर जाणाऱ्या हरिहर पालीकडे तो पहात राहिला. दूर दूर जाणाऱ्या घोड्यांच्या टापांचे आवाज ऐकत तो उभा होता.

रामपाल तिवारी बोलू शकले तर आपल्याला भरपूर माहिती देऊन जातील, असे त्याला वाटत होते. सूडाच्या भावनेने तो उभा पेटून निघाला होता. संशय आला म्हणून कुणाच्याही मागे धावणं धोक्याचे आहे, असे त्याला वाटत होते. आणि म्हणूनच शांत डोक्याने हालचाल करण्याचा निर्णय त्याने घेतला होता.

रत्नाला पळवून नेणाऱ्या दरोडेखोराना उभे चिरण्याचा निश्चय त्याने केला होता.

□ □



## तीन

घनदाट रानात आणि अत्यंत अवघड अशा ठिकाणी चामुंडेश्वराचे देऊळ बांधण्यात आले होते.

धोलासिंग पवनार याने चामुंडेश्वराची छोटीशी मूर्ती त्या ठिकाणी कुठून तरी आणली होती. आणि तिची स्थापना करून ते छोटेसे देऊळ उभारले होते.

त्या देवळाच्या सभोवताली डोंगर दऱ्या आणि झाडाझुडपा-शिवाय काहीच नव्हते. सभोवतालचा चारपाच कोसाचा परिसर निर्मनुष्य होता. त्या देवळात येणे देखील अत्यंत जिकीरीचे आणि कष्टाचे होते.

चामुंडेश्वराच्या देवळापासून उत्तरेला सुमारे दीड दोन कोसा-वर एक भव्य असे जुनाट पडके मंदीर होते. त्या देवळात चामुंडा-देवीची तीन पुरुष उंचीची उग्र अशी मूर्ती होती.

अत्यंत जागृत असे ते देवस्थान मानले जात होते. दूर दूरचे

राजे महाराजे देखील त्या देवालयात कौल घेण्यासाठी येत होते. पण त्या देवासाठी काहीही संपत्ती अगर भेट, देवाला देण्याची प्रथा नव्हती.

त्या देवालयाचा पुजारी अत्यंत उग्र आणि भयंकर वाटत होता. धिप्पाड आणि आडव्या तिडव्या देहाचा तो पुजारी जसा दिसत होता तसाच वागत होता. त्याची तपस्याही तितकीच कठोर होती.

त्या पडक्या पण भव्य अशा मंदिरात तो एकटाच रहात होता. त्याला कसलीही भीती वाटत नव्हती. रानातील दरोडेखोर आणि हिंस्र श्वापदे याची भीती त्याला कधीच वाटली नव्हती. आयुष्यात त्याने कधी शस्त्राला स्पर्श केला नव्हता, हे स्पष्ट दिसत होते.

हा पुजारी वाटेत भेटला, तर पाहणाऱ्या शस्त्रधारीची देखील पाचावर धारण बसत असे.

आता हा पुजारी अवघड वाट तुडवीत चालला होता. तो कदाचित बुंदीहूनही आला असावा. भगवी वस्त्रे त्याने धारण केली होती. कोवळ्या सूर्यप्रकाशात त्याने पिकलेले केस चांदीप्रमाणे चकाकत होते.

म्हातारा झाला असला तरी, त्याची ताकद, वाखाणण्याजोगी होती. तरुणालाही लाजवील इतक्या सफाईने एक उभी दरड चढून तो मार्गाला लागला, त्यावेळी तो त्या चामुंडेच्या मंदिरापासून सुमारे दीड कोसांवर होता.

अचानक तो थबकला. टेकडाच्या माथ्यावर थांबून त्याने पलिकडच्या टेकाडाचा उतार उतरताना कुणीतरी दोन स्त्रियांना पाहिले. त्याचे डोळे त्या उन्हातही चकाकले. तो जागच्याजागी विचारमग्न होऊन उभा राहिला. कठोर डोळे त्या दोन स्त्रियांच्या दिशेने रोखलेले होते.

त्याला आश्चर्याचा धक्का बसला असावा हे स्पष्ट दिसत होते.

कारण, त्या भागात एकट्या दुकट्या स्त्रिया त्याने अगदी आयुष्यात प्रथमच पाहिल्या होत्या. साधारणपणें पुरुष देखील एकट्याने येण्याचे धैर्य त्या ठिकाणी दाखवीत नसत. कारण, हिंस्त्र श्वापदे आणि दरोडे-खोर यांची ख्याती त्या भागात बरीच पसरली होती.

त्या दोन्ही तरुणी ज्या भागातून घाईघाईत धावत येताना दिसत होत्या, तो भाग पुजाऱ्याच्या दृष्टीने अत्यंत धोक्याचा होता. चुकून पाय घसरला आणि खाली पडली तर जगणार नाही, याची खात्री त्याला होती.

ओरडून सावध करावे असे त्याला क्षणभर वाटले. नंतर त्याने तो विचार बदलला. कारण, त्या दोन्ही स्त्रिया त्याच्याच रोखाने देत येत होत्या. त्या चामुंडेश्वराच्या देवळातून तर आल्या नाहीत ना ?

पण त्याला तीही शक्यता वाटत नव्हती. कारण, एकतर चामुंडेश्वराचे मंदिर अत्यंत अवघड अशा जागी होते.. आणि स्त्रियांना त्या भागात जाण्याचा एक प्रकारचा धसका होता. तरुण पुजारी आणि त्याचा एक सहकारी हे दोघे सोडले तर त्याही परिसरात कुणी रहात नव्हते..

बरे, त्या दोन्ही स्त्रिया चामुंडेच्या मंदिराकडेही येत नव्हत्या. भलत्याच मार्गाने त्या चालल्या होत्या. त्या ज्या दिशेने चालल्या होत्या, त्या दिशेला चारपाच कोसांवर देखील एखादे खेडे नव्हते. अगर घर नव्हते.

होते ते घनदाट रान आणि दरोडेखोरांची ये जा.

पुजारी संथपणे एकेक पाऊल पुढे टाकीत होता. त्याच्या मनाचा थांग कुणालाही लागणे शक्य नव्हते. दोन्ही स्त्रियाना अडव-ण्याचा विचार त्याने केला होता. एक आडोसा पाहून तो त्यांच्या येण्याकडे डोळे लावून बसला होता.

जेव्हा अतिशय धोक्याच्या घाटीजवळ त्या दोन्ही स्त्रिया पोचल्या, तेव्हा त्या पुजाऱ्याची चलबिचल झाली. झटक्यात तो पुढे

सरकला आणि ओरडून त्याने दोन्ही स्त्रियाना सावध केले. दोघीनीही चमकून आवाजाच्या रोखाने पाहिले. त्या घाबरल्या, हे पुजाऱ्याने इतक्या दुरून देखील ओळखले होते. घाबरलेल्या त्या तरुणींच्या हातून कोणतीही चूक होण्याची शक्यता होती. आणि ती चूक झाली तर त्याना वाचवणे कुणाच्याही हातात नाही, हे देखील त्या पुजाऱ्याच्या लक्षात आले होते.

घाबरलेल्या तरुणी थबकल्या. कदाचित त्यानी भगव्या वेषातील त्या उग्र पुजाऱ्याला पाहिले असावे, हे त्याला स्पष्ट दिसत होते.

कारण, मागे जावे की पुढे जावे हाच विचार त्यांच्या डोक्यांत घोळत असावा. भांबावल्यासारख्या त्या दोघीही सभोवताली पळून जाण्यासाठी पहात होत्या. कारण, मागे जाणेदेखील त्याना धोक्याचे वाटत असावे

एकाएकी दोघीही डाव्या बाजूचा चढ चढू लागल्या. घनदाट रान नसलेली तेवढीच काय ती जागा होती. पुन्हा त्या पुजाऱ्याने ओरडून त्याना सावध करण्याचा विचार केला. पुजाऱ्याचा आवाज ऐकताक्षणीच त्या आणखी घाबरल्या याची जाणीव त्याला झाली. जीव तोडून त्यानी आपल्या धावण्याचा वेग वाढविला.

पुजारी दचकला खाली एखादी पडलीच तर जिवंत सापडणे शक्य नाही, याची जाणीव पुजाऱ्याला झाल्यामुळेच त्याने सरळ त्यांच्या रोखाने पळायला सुरुवात केली. म्हाताऱ्या पुजाऱ्याला त्या भागाची इतकी माहिती होती की, एखादे रानटी जनावर देखील त्या भागातून पळायला धजावले नसते अशा भागातून तो पुजारी त्याना गाठण्यासाठी धावत होता.

पुजाऱ्याने अर्धे अंतर तोडले. आणि एक भयानक किंकाळी त्याच्या कानात शिरली. आणि दोन्हीतील एक स्त्री खाली गडगड-ताना त्याला दिसली. तिच्या ओरडण्याचा आवाज चारी बाजूनी

प्रतिध्वनित होत होता. आणि पुजाऱ्याच्या काळजाचे पाणी पाणी होत होते

धावता धावताच तो जागच्या जागी थबकला. आता त्या स्त्रीला वाचवणे आपल्या हातात नाही, याची जाणीव त्याला झाली. दुसरी धाबरलेली स्त्री त्याच्या नजरेआड झाली होती. आणि बावचळण्यासारखा तो त्या तरुणीचा नजरेने वेध घेण्याचा प्रयत्न करीत होता.

सूर्याची किरणे तापली, तरीही तो जागच्या जागी थक्क होऊन उभा होता. खाली पडलेली तरुणी कोणत्या भागात असेल, याचा अंदाज घेण्याचा प्रयत्न तो करीत होता. पण त्याला ते जमत नव्हते. नेमकी ती तरुणी कोणत्या भागात घसरली असेल हे त्याच्या लक्षात येत नव्हते.

अखेर त्याने खाली खाली उतरायला सुरुवात केली. ज्या मार्गाने तो दोन्ही स्त्रियांना वाचवण्यासाठी काही वेळापूर्वी जीव तोडून धावत होता. त्याच मार्गाने आता त्याला अतिशय सावधगि-रीने खाली उतरावे लागत होते. खाली कोसळलेल्या तरुणीकडे पाहिल्यानंतर त्याच्या मनाने भलताच धसका घेतला होता.

सूर्य माथ्यावर आला तरी तो त्या तरुणीच्या प्रेताचा शोध घेतच राहिला. भटकून भटकून तो थकला होता. पण त्या थकण्याची जाणीव मनाला स्पर्श देखील करणार नाही. याची खबरदारी तो घेत होता.

कितीतरी वेळ ज्या ठिकाणाहून ती कोसळली, त्या ठिकाणी उभा राहून त्याने विचार केला. आणि हळूहळू खाली उतरायला सुरुवात केली. खाली उतरुन सरळ रेषेत दुसरे टेकाड ओलांडले की तो सरळ चामुंडेच्या देवळात पोहोचणार होता.

कसाबसा तो अर्ध्याअधिक उतारावर आला आणि वाऱ्याने काहीतरी फडफडताना त्याला दिसले. त्याचे डोळे चमकले. जे शोध-

ण्यासाठी त्याने आतापर्यंत आटापिटा केला होता. ते आता सहजा-सहजी त्याला सापडले होते.

घाईघाईत तो आडव्या उतारावरून त्या ठिकाणी आला. एक सुंदर तरुणी एक दगड आणि झुडूप यांच्या बेचक्यात अडकली होती. तिचे संपूर्ण शरीर रक्ताळले होते. त्याने पाहिली ती तिची गुलाबी रंगाची ओढणी अद्याप देखील वाऱ्यानें फडफडत होती.

क्षणभरच तो निश्चल उभा राहिला. त्याच्या डोळ्यांतील भाव सारखे बदलत चालले होते. त्या तरुणीला जिवंत आहे, की ठार झालेली आहे, हे पहाण्यासाठी तो खाली वाकला. आपला दणकट हात त्याने पुढे केला. तो थरथरत होता. त्याच्या मनातील चलबिच-लता डोळ्यांत स्पष्ट दिसत होती. त्या तरुणीच्या रोखाने त्याचा हात जसा खाली गेला, तसाच तो झटक्याशरशी वर आला. त्या तरुणीला स्पर्शदेखील करण्याचे धैर्य त्याला झाले नसावे.

एका एकी त्याचे डोळे कठोर झाले. त्याने झटक्यात खाली वाकून तिचे निश्चल शरीर तपासले. त्याचे कठोर डोळे वेगळ्याच तेजाने चमकले. ती मेलेली नसून जिवंत आहे, या कल्पनेने तो खूष झाला. सभोवताली नजर टाकून त्यानें आपल्या वाटेचा अंदाज घेतला तिला उचलून आपण नेऊ शकू की नाही, हाच विचार तो करीत होता.

कारण, एका माणसाचे ओझे खांद्यावर घेऊन तो जीवघेणा उतार किंवा चढ चढणे ही सामान्य गोष्ट नव्हती.

पण तो पुजारी सामान्य माणूस नाही, याची जाणीव लगेच झाली. त्याने काटयाकुटयात अडकलेली तिची ओढणी अलगद सोड-वून काढली. ती ओढणी तिच्या भोवती गुंडाळली आणि सरळ उच-लून तिला खांद्यावर आडवे घेतले. पहाडासारखा दिसणारा तो साधू पुजारी निश्चयाने अत्यंत अवघड असा उतार उतरत होता.

+ + +

उदयसिंह चौहानाला इतका मोठा धक्का कधीच बसला नव्हता. त्याची मती कुंठीत झाल्यासारखी झाली होती. भारावलेल्या नजरेनें तो जखमानी जर्जर झालेल्या रामपाल तिवारीकडे पहात होता.

'चौहान, रत्ना सापडली ?' तिवारीनी शुष्कपणें विचारलें. दोन दिवसात हा प्रश्न विचारण्याची त्यांची ही दहावी तरी वेळ होती. आणि उदयसिंह चौहान दरवेळी ठरलेलेच उत्तर देत होता—

'नाही, पण मी तिला शोधून काढीन.'

उदयसिंह चौहानाकडे पहाण्याची रामपाल तिवारीची नजर–देखील पार बदलून गेली होती. अविश्वासाच्या नजरेंने ते आता उदयसिंह्याकडे पहात होते आणि याच गोष्टीचे दुःख उदयला सतत सतावीत होते.

थंड असलेल्या उदयची नजर भैय्या खानावळवाल्याच्या नजरेवर पडली. आपल्याला तो काहीतरी सांगण्याचा प्रयत्न करीत आहे, याची जाणीव त्याला झाली. हळूहळू तो भैय्याकडे सरकला.

'चौहान, मला तुमच्याशी काही बोलायचं आहे.' थंड आवाजात आणि हलकेपणाने त्याने सांगितले. त्याचा आवाज जड आणि ओलावल्यासारखा झाला होता.

'काय ?'

'रत्नाचा धस्का त्यानी बराच घेतलेला आहे. चौहान, सगळे मार्ग संपले की माणूस देवाकडे धावतो. आणि...' भैय्या खानावळ-वाला बोलता बोलता थांबला. त्याचे डोळेपाणावला सारखे झाले होते. तिवारी कुटुंबावर अत्यंत प्रेम करणारा तो म्हातारा मनाने हलला होता. आणि मनात आलेले बोलावे की बोलू नये अशी विचित्र अवस्था त्याची झाली होती.

भैय्याच्या त्या शेवटच्या वाक्याने उदयसिंह चौहानाला देखील हलवून सोडले होते. त्याची अवस्था कधीही झाली नव्हती, इतकी

चमत्कारिक बनली होती.

' भैय्या, मी देखील दैविक उपायाना मानतो रत्नाला शोधून काढण्यासाठी कोणतंही दिव्य पार पाडायची माझी तयारी आहे. तुझ्या माहितीत एकादा दैवी उपाय असला तर मला जरुर सांग.' उदय ओढलेल्या आवाजात बोलत होता. त्याच्या मनावर फार मोठा आघात झालेला आहे, हे आतापर्यंत शांत असलेल्या हरिहर पालीच्या लक्षात आले होते. अशावेळी उदयला जपणे हे त्याचे कर्तव्य होते. त्याच्या हातून कोणताही वेडेपणा होऊ नये म्हणून तो अतिशय सावध होता.

' चौहान, अखेर माणसापेक्षा परमेश्वर हा श्रेष्ठच असतो. माणूस थांबतो तेव्हा परमेश्वर चालत असतो. आपण त्याचाच सल्ला घ्यावा. आपल्याला निश्चित असा काहीतरी मार्ग सापडेल.' भारावलेल्या आवाजात भैय्या बोलला.

भैय्याचा आवाज दबल्यासारखा झाला होता. आपण सांगतो ते चौहानाला पटेल की नाही, हीच शंका त्याच्या डोळ्यातून व्यक्त होत होती. अपेक्षेने तो उदयच्या चेहऱ्याकडे पहात होता.

' चौहान, तुमचा मनगटावर विश्वास, पण आम्ही देवावर विश्वास ठेवणारी भोळी माणसं. माझी एक विनंती...'

भैय्या, खुल्या दिलानं सांग, माझ्यान जे करता येईल ते सर्व मी करीन.'

' चौहान, इथून चारपाच कोसावर एक चामुंडेचे देऊळ आहे.' भैय्याने सांगितले.

' हो मला ते माहित आहे.'

' ते अतिशय जागृत असे देवस्थान आहे. दूरदेशीचे राजे महाराजे देखील देवीचा कौल घेण्यासाठी त्या ठिकाणी येतात. आपणही देवीचा कौल घ्यावा असं मला वाटतं.'

' भैय्या, आम्ही तिथं जरूर जाऊ. देवीची कौल घेऊ.' त्याच्या

नजरेत आता वेगळेच भाव चमकले होते. भैय्या खानावळवाल्याच्या भावना त्याने ओळखल्या होत्या.

थोड्याच वेळात हरिहर पालीला घेऊन उदयसिंह चौहान तिवारींच्या बंगल्यातून बाहेर पडला, चामुंडेचे देऊळ त्याच्या माहितीचे होते. पण कुणाच्याही तोंडून एक शब्ददेखील बाहेर पडत नव्हता.

तीन दिवसात उदयसिंह चौहानाने दरोडेखोरांचा माग काढण्याचा आटोकाट प्रयत्न केला होता. त्यांची माहिती काढण्याचा भरपूर प्रयत्न केला होता. पण आतापर्यंत त्यांच्या हातात काहीही आले नव्हते. आपल्या हातात काही येईल याची अपेक्षाही आता नष्ट झाली होती. आयुष्यातील पहिले पहिले अपयश आपण या पटणीतच घेतो की काय असे त्याला झाले होते.

पटणी गावातील म्हातारीच्या सुनेला पळवल्यानंतर तिला पळवणाऱ्या दरोडेखोराना आपण सहजासहजी पकडू, असे उदयला सुरुवातीला वाटत होते. चारपाच कोसांचे अंतर कापले तरी तो आपल्याच धुंदीत होता. हरिहर पालीशी त्याने एक शब्द देखील उच्चारला नव्हता.

सूर्य बऱ्याच पश्चिमेकडे झुकला होता. आणि गर्द झाडीत दडलेल्या चामुंडेच्या जुनाट अशा देवळाचे शिखर त्यांच्या नजरेत आले. केव्हा एकदा ते देऊळ गाठतो, असे त्याना होऊन गेले होते. पण घोड्याना आणखी पिटाळण्याचे धैर्य त्याना होत नव्हते. बेसावधपणे घोड्याचा पाय घसरला तर घोडा आणि घोड्यावरचा स्वार जिवंत रहाणेच शक्य नाही, असे दोघानाही वाटत होते.

ते मंदीराच्या दारात उतरले. तेव्हा अंधाराला तोंड फुटले होते. तेलाच्या दिव्यांच्या मंद उजेडात चामुंडा देवीची भव्य मूर्ती दोघांचीही मने हेलावून टाकीत होती. तिची उग्र नजर आपल्याला काहीतरी विचारते आहे, असा भास उदयसिंह चौहानाला होत होता.

मूर्तीच्या डाव्या अंगाला भिंतीत खोवलेली एक मशाल जळत होती. आणि एक जटाधारी साधू देवळाच्या दाराकडे पाठकरून ध्यानस्थ बसलेला दिसत होता.

घनदाट रानात आणि अत्यंत अवघड अशा जागेत ते देऊळ होते. अत्यंत भव्य असे ते देऊळा पडझडीला आले होते. उगाचच भयाणता त्या देवळाने आधीच निर्माण करून ठेवली होती. चामुंडेची ती विशाल मूर्ती, मूर्तीकडे तोंड करून बसलेला आणि आता पाठमोरा दिसणारा धिप्पाड शरीराचा आणि संपूर्ण केस पिकलेला तो साधू त्या भयाण आणि गंभीर वातावरणात अधिकच भर घालीत होते.

आणि धडधडत्या अंतक:रणाने उदयसिंह चौहान देवळाची एक एक पायरी चढत होता.

☐



## चार

सूर्य बराच वर आला आणि एकूण बारा घोडेस्वार चामुंडेश्वराच्या देवळाला वळसा घालून मागच्या बाजूच्या पहाडानी वेढलेल्या भागात शिरले.

सर्वात अग्रभागी धोलासिंग पवनार दौडत होता. पांढऱ्या शुभ्र घोड्यावर तो स्वार झाला होता. त्याच्या मागेच हात आणि तोंड बांधलेली एक तरुणी, घोडेस्वारा समोरच बसली होती. ती तरुणी धोलासिंगने बळी देण्यासाठी आणली होती. केवळ एक तरुणी पळवण्यासाठी चार दिवसात त्याने चौथा दरोडा घातला होता. आणि तो यशस्वी केला होता.

ते घोडे अतिशय चपळ दिसत होते. ज्या भागातून माणूस देखील उतरायला कचरेल त्या भागातून ते घोडे सहजरित्या खाली उतरत होते. घसरून खाली पडण्याची भीती कोणत्याही घोडेस्वाराच्या नज-

रेत दिसत नव्हती.

संपूर्ण पहाड उतरल्यानंतर सर्व घोडेस्वार एका गर्द झाडीत घुसले, आणि थोडे अंतर कापून एकेकटयाने आपल्या घोड्यांसह चिंचोळया गुहेत शिरले. फक्त एक घोडा आत शिरेल इतकी ती अरुंद वाट होती. आणि गर्द झाडीने दडल्यामुळे ती दिसत नव्हती.

घोडेस्वरांची चाहूल लागताच आत असलेल्या दोघातिघानी चिंचोळया वाटेत मशाली लावायला सुरुवात केली. मशालींच्या उजेडात ते एका गोलाकार अशा गुहेत येऊन पोहोचले. भुयार संपले होते. त्या ठिकाणी बऱ्याच मशाली जळत होत्या. धोलसिंग आणि त्याचे साथीदार येताच दहाबारा दरोडेखोरानी तिथे गर्दी केली होती.

काही न बोलता धोलसिंग खाली उतरला पकडून आणलेल्या तरुणीला देखील त्या ठिकाणीं उतरवण्यात आले. तिच्या तोंडावरचे बांधलेले फडके कापून काढण्यात आले. तिच्या हातांच्या दोऱ्याही कापण्यात आल्या.

मध्यम वयाची ती स्त्री अतिशय घाबरलेली होती. तिचा सुंदर चेहरा भयभीत दिसत होता. भीतीने ती सारखी रडत होती. पण तिच्या तोंडून शब्ददेखील बाहेर पडत नव्हता.

' रडू नकोस. माझ्या देवाला तू खूष करणार आहेस. देवाच्या दारी जाताना माणसाने खूष असायला हवं. ' धोलसिंगाने कठोर आवाजात तिला समजावण्याचा प्रयत्न केला.

पण तिच्यावर त्याचा काहीही परिणाम झाला नाही, धोलसिंगाच्या बोलण्याने ती अतिकच घाबरली. भीतीने तिने सभोवताली नजर फिरवली. पण तिच्याकडे दयेच्या भावनेने पहायला त्या गुहेत कुणालाही वेळ नव्हता.

' तिला आत घेऊन जा, आणि त्या दोघीजवळ ठेवा. ' धोलसिंगाने कठोर आवाजात एक दरोडेखोराला बजावले. घाई-

घाईत पुढे येऊन त्या दणकट शरीराच्या तरुणाने त्या स्त्रीचा दंड पकडला. आणि घाबरून तिने जोरात हंबरडा फोडला. आपल्याला आपला देव देखील वाचवू शकणार नाही, हे तिच्या लक्षात येऊन चुकले होते. तिचा आर्त हंबरडा ऐकून त्या दरोडेखोर तरुणाच्या हृदयाला थेंबाचा देखील पाझर फुटला नव्हता.

तो तरुण तिला घेऊन एका भुयारात अदृश्य झाला. तिच्या ओरडण्याचे आवाज देखील अस्पष्ट होत गेले. आणि त्याचवेळी एक बुटकासा मध्यमवयीन माणूस आत शिरला. उड्या मारल्यासारखा तो चालत होता.

'महाराज, काम फत्ते झालं ?'

'भटजी, चामुंडेश्वराचा आशिर्वाद असताना काम फत्ते झाल्या शिवाय राहील थोडंच. आता फक्त दोन दरोडे राहिले. घोलसिंग पहाडी आवाजात खूष होऊन म्हणाला, आणि कमरेला खोचलेली एक थैली काढून त्या भटजीच्या रोखाने भिरकावली. अगदी सहजरित्या भटजीने ती झेलली होती. थैलीतील नाण्यांचा आवाज शांत वातावरणात घुमला होता.

'महाराज पुढचा दरोडा दूर घालावा लागेल.' भटजीने थैली कनवटीला लावीत गंभीर आवाजात सांगितले. घोलसिंगचा आवाज त्यावेळी उगाचच कठोर बनला होता.

'भटजी, आम्ही दरोडा घालणार तो नजीकच. माझ्या संकल्पाला लागणाऱ्या खात्रीच्या स्त्रीया मला हव्यात.'

'जरूर मिळतील महाराज. एकाच दरोड्यात अलिगडहून दोन स्त्रिया पळवायच्या आहेत.'

'तुझ्या खात्रीच्या आहेत.'

'हो महाराज.'

'बागवानला नीट कल्पना दिलीस ?'

'दिली महाराज, तो फक्त आपल्याच आज्ञेची वाट पहात आहे.'

भटजीने नम्रतेच्या सुरात सांगितले.

‘ तो कुठं आहे ?’

‘ मीच त्याला देवळात थांबायला सांगितले. ’

‘ मग जा, त्याला सांग दोन्ही स्त्रियांची नीट माहिती काढून आण. आजपासून तिसऱ्या रात्री आम्हाला दरोडा घालायचा आहे. ’ धोलासिंगाने कठोर आवाजात जवळ जवळ त्या भटालाच हुकूम सोडला. आणि धोलासिंगाची आज्ञा सिरसावंद्य मानून तो भटजी उड्या मारीत जसा आला तसा निघून गेला.

थैली मिळताच तो अतिशय खूष झाला होता. पण आपली खुषी तो धोलासिंगापुढे व्यक्त करू शकत नव्हता. चेहऱ्यावर देखील त्याने ती खुषी येऊ दिली नव्हती.

धोलासिंग गंभीर बनला. तीन दिवसात आपल्याला काहीही काम करायला मिळणार नाही, हेच दुःख त्याच्या नजरेत स्पष्ट दिसत होते.

धावत येणाऱ्या एका तरुणाकडे पाहून तो चरकल्यासारखा झाला. नुकतीच आणलेली तरुणी कैदेत ठेवण्यासाठी तो घेऊन गेला होता. आणि आता त्याच्या चेहरा पाहून काहीतरी बिनसलेलं आहे, याची कल्पना धोलासिंगाला येऊन चुकली होती.

‘काय झालं ?’ धोलासिंगाने ओरडूनच विचारले.

‘ महाराज त्या दोघीही पळाल्या.’ त्या तरुणाने थरथरत्या आवाजात सांगितले. आता आपले काय होईल याच कल्पनेने तो घाबरुन गेला होता.

आणखी काही विचारायला धोलासिंग तिथे थांबलाच नाही, अनामिक भीतीने त्याचे शरीर थरथरत होते. क्रोधाने त्याचे मस्तक चढले होते. आपल्या संकल्पाला हा अपशकून आहे, असेच त्याला आता वाटू लागले होते.

चवताळलेल्या अवस्थेत तो एका छोट्याशा गुहेत शिरला.

त्याच ठिकाणी यापूर्वी त्याने दोन स्त्रियाना कैदेत ठेवले होते. आता त्या ठिकाणी तीन स्त्रिया दिसायला हव्या होत्या. त्याऐवजी आता एकच स्त्री थरथरत्या नजरेने त्याच्याकडे पहात अंग चोरुन उभी होती. कोणत्या प्रकाराने त्या पळाल्या असतील, हाच विचार करीत सुन्न होऊन तो उभा होता. या अपशकुनाने आपल्या अपयशाला तर सुरुवात झालेली नाही ना, हीच शंका त्याच्या मनाला सारखी भेडसावीत होती.

'या ठिकाणी पहाऱ्यावर कोण होतं.' त्याने कठोर आवाजात मागे वळून विचारले आणि त्याच्या मागेच उभा असलेला तरुण थरथरुन गेला. त्याच्या चेहऱ्यावर मूर्तीमंत भीती उभी राहिली. धोलसिंगाच्या प्रश्नाचे उत्तर देण्याचे धैर्य देखील त्याला झाले नाही.

धोलसिंग पुन्हा एकदा कडाडला आणि त्या तरुणाच्या तोंडून कसेबसे शब्द बाहेर पडले.

'आम्ही चौघे होतो महाराज.' त्या तरुणाच्या तोंडून थरथरत्या आवाजात शब्द बाहेर पडले होते.

'ती कशी पळाली ?' धोलसिंग स्वत:वरचा ताबा उडाला होता.

'आम्हाला माहीत नाही महाराज. ती या गुहेतून बाहेर आलेली नाही. आम्ही चौघेही बाहेरच होतो.' थरथरत्या आवाजात त्यानें धोलसिंगाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला.

पण धोलसिंगाची समजूत तेवढ्याने पटणारी नव्हती. आपण इतक्या प्रयत्नाने पकडून आणलेल्या दोन तरुणी पळून जाव्यात ही त्याच्या दृष्टीने सामान्य घटना नव्हती.

क्रोधाने थरथरत त्याने खसकन् तलवार उपसली. कुणाच्याही लक्षात येण्यापूर्वीच ती विजेच्या वेगानें हवेत शिरली. त्या धिप्पाड तरुणाचे शीर क्षणात धडावेगळे झाले. त्या तरुणाचे धड हे लडबडत

असतानाच इतर तिघानाही आणण्याचा हुकूम त्याने सोडला थोडयाच वेळात आणखी तिघांची डोकी धडावेगळी करून तो गुहेत आला, तेव्हा ती स्त्री आणखीनच घाबरून गेली होती. आणि धोलसिंग तिच्याकडे पहात, दोघी कोणत्या मार्गाने पळाल्या असाव्यात याचा विचार करीत उभा राहिला.

× × ×

उदयसिंह चौहानाच्या मनावर उगाचच दडपण आले होते. आपण इथे येण्यात काही चूक तर करीत नाही ना, असेच त्याला सारखे वाटत होते. दोघानीही पायातील जोडे बाहेर काढून ठेवले आणि आत जाता जाता हरिहर पालीने भलीमोठी घंटी वाजवली.

त्या शांत वातावरणात विजेचा कडकडाट व्हावा तसाच तो घंटानाद वाटला. ध्यानस्थ बसलेल्या पुजाऱ्याने शांतपणे मागे मान वळवली. कुणीतरी आलेलं आहे, हे त्याने घोडयांच्या टापांवरून ओळखले होते. त्याने आपले लालभडक डोळे क्षणभरच त्या दोघांवर रोखले आणि लगेच पूर्वीसारखा ध्यानस्थ बसून राहिला.

दोघानीही मूर्तीजवळ जाऊन साष्टांग नमस्कार घातले. आणि त्या पुजाऱ्याची तंद्री भंग होईपर्यंत वाट पहावी या उद्देशाने ते देवळाच्या पायरीवर जाऊन बसले. दाराच्या आतल्या बाजूला ठेवलेल्या मशालीचा उजेड अस्पष्ट असा पायऱ्यांवर पडत होता. आणि काहीतरी चकाकताना उदय पहात होता. सहज कुतुहलाने त्याने ती वस्तु उचलली.

ती वस्तू, स्त्रिच्या कानातील सोन्याचे डूल होते. उदय विचारात पडला. आपण हे डूल कुठेतरी पाहिलेले आहेत, असे त्याला वाटत होते. आत बसलेल्या पुजाऱ्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात त्याने ते डूल खिशात टाकले.

' आत या. ' पुजाऱ्याचा कठोर आवाज त्यांच्या कानात शिरला. आणि दोघेही झटक्यात उठून उभे राहिले. घाईघाईत ते

पुजाऱ्याजवळ आले, तेव्हा तो पुजारी भांड्यातील तेल पेटलेल्या समयातून भरीत होता. अधून मधून तो दोघानाही न्याहाळीत होता. त्याची कठोर आणि तेजस्वी नजर दोघानाही असह्य होत होतीं. चोरासारखी त्यांची अवस्था झाली होतीं.

'आपण वाटसरू आहात, का खास देवींच्या दर्शनासाठी आलेले आहात ?' तेलाचे भांडे नीट कोपऱ्यात ठेवीत पुजाऱ्याने विचारले. वयाच्या मानाने त्याचा आवाज अत्यंत कठोर होता. पण त्या आवाजात मार्दव होते. त्यांच्याविषयीं आपुलकीं त्यात काठोकाठ भरली होती.

'महाराज, आम्ही खास करून देवीच्या दर्शनासाठीच आलो आहोत. आम्हाला देवीचा कौल हवाय.' उदयसिंह चौहानाने नम्र आवाजात सांगितले आणि वाकून त्याने पुजाऱ्याला अभिवादन केले.

'सांगा, तुम्हाला कशासाठी कौल हवा, ते देवीसमोर उभे राहून सांगा.' पुजाऱ्याने पूर्वीच्या आवाजातच त्यांना सांगितले. आणि उदय सरसावला. पण त्यावेळी त्याच्या मनाचा गोंधळ उडाला होता.

देवळात कौल लावण्यासाठी जाण्याचा हा त्याचा पहिलाच प्रसंग होता. नेमके काय करायला हवे, आणि कोणत्या पद्धतीने देवाला सांगायला हवे, हे त्याच्या लक्षात येत नव्हते. इतका शूर आणि निधड्या छातीचा उदयसिंह चौहान, पण तोही भांबावून गेला होता.

आपल्या समोर असलेला जटाधारी पुजारी सामान्य नाही याची खात्री त्याला पटली होती. त्याच्या डोळ्यांचा आणि तेजस्वी चेहऱ्याचा नकळत प्रभाव उदयवर पडला होता. आणि त्याची कल्पना हरिहर पालीला देखील आली होती.

'सांगा, सांगा. तुमच्या मनात जे काय असेल ते देवीपुढे सांगा. न बोलता गप्प उभा राहिलेल्या उदयकडे पहात तो पुजारी बोलला. पूर्वीपेक्षाही त्याचा आवाज आता अधिकच खालच्या पट्टीत आला

होता.

'महाराज,...'

'तरुणा, ते मला सांगू नकोस. अरे, तू देवापुढं आलास. माझ्याकडं नाही. या देवीपुढं लीन हो, तुझ्या मनातील इच्छा ती पूर्ण करील.' पुजाऱ्याने जवळ येत प्रेमळ सुरात सांगितले, आणि तो चेहऱ्यावरून वाटतो तितका कठोर नाही, याची कल्पना उदयला आली.

पण त्या पुजाऱ्याच्या विषयी त्याच्या मनात असलेला संशय मात्र दूर झाला नाही.

त्या मंदिरात सहजासहजी स्त्रिया फिरकत नाहीत, अशीच ख्याती होती, असे असताना एखाद्या तरुणीच्या कानातील डूल देवळाच्या दारात सापडावे ही सामान्य घटना नव्हती.

कदाचित या देवळात काहीतरी काळे बेरे असावे, असा एक संशय त्याच्या मनात उभा राहिला होता. पण त्या पुजाऱ्याच्या बोलण्याने तो संशय देखील हळुहळू विरळ होत चालला होता.

आपण का आलेलो आहो, हे मोघमपणे उदयसिंह चौहानाने देवीपुढे सांगितले. आपण रत्ना नावाच्या तरुणीच्या शोधात आहोत, हे न सांगता त्याने आपण एका तरुणीच्या शोधात आहोत असे सांगितले होते. पुजारी कान देऊन ते ऐकत होता.

अखेर त्या पुजाऱ्याने बारीक पानाच्या पाकळ्या पाण्यात बुडवून देवीच्या विविध अंगाला चिकटवायला सुरुवात केली आणि तोंडातल्या तोंडात मंत्र पुटपुटल्यासारखा करीत उभा राहिला.

कौल म्हणजे काय याची कल्पना हरिहर पालीला होती, पण उदयसिंह चौहानाला काहीच माहित नव्हते. तो फक्त पुजारी, मूर्ती आणि मूर्तीला चिकटवलेल्या त्या पाकळ्या यांच्याकडे आळीपाळीने पहात होता.

अखेर देवीच्या उजव्या अंगाची एक पाकळी देवीच्या पायाशी

पडली. ती पाकळी खाली पडताच पुजाऱ्याच्या चेहऱ्यावरचे समाधान उदयने अचूक टिपले. आणि आपल्याला योग्य असाच कौल लागलेला आहे याची कल्पना त्याला आली.

'बेटी, तुला ती तरुणी सापडेल.' पुजाऱ्याच्या तोंडून नेहमी-च्याच कठोरपणाने शब्द बाहेर पडले. आणि पुजाऱ्याने दिलेला प्रसाद हातात घेऊनच दोघेही चामुंडेच्या देवळातून बाहेर पडले.





## पाच

वेळ मध्यरात्रीची होती. बेचैन बनलेला धोलसिंग आपल्या गुहेत येरझारा घालीत होता. त्याचे डोळे अद्याप शांत झाले नव्हते. तापलेल्या अवस्थेत त्याने आपल्याच चौघा सहकाऱ्यांना ठार केले होते. आणि तरीही त्याचे त्याला काहीच वाटले नव्हते.

आपली सर्व माणसे त्याने पळालेल्या तरुणींच्या मागावर सोडली होती. आजुबाजूचा सर्व भाग चाळून काढा आणि त्या स्त्रियाना पकडून आणा असे सक्त हुकूम त्याने सोडले होते. जो त्याना घेऊन येईल त्याला भरपूर इनामही त्याने जाहीर केले होते.

पण मध्यरात्र उलटून गेली तरी, त्याचा एकदेखील माणूस परत आला नव्हता.

आपली माणसे मूर्ख कशी बनली, हाच विचार तो चकरा मारता मारता करीत होता. एका छोटयाशा कपारीतून त्या दोन्ही तरुणीनी मार्ग काढावा ही घटना त्याला कायम छळणारी होती.

अत्यंत अवघड अशा भागातून त्यानी पळ काढला होता. त्या दोन्ही स्त्रिया ज्या भागातून पळाल्या तो भाग पहाता पहाताच त्याचे काळीज थरारुन गेले होते. आणि तिसरी तरुणी त्याच मार्गाने पळून जाणार नाही, याची खबरदारी त्याने कसोशीनें घेतली होती.

एकाएकी दूरवर चाललेला गलबला ऐकून त्याने कान टवकारले. कुणीतरी जवळ जवळ येत आहे, याची कल्पना त्याला आली. कदाचित दोन तरुणींच्या मागावर पाठवलेले आपले सहकारीच परत आले असावेत असे त्याला वाटले.

ज्या अर्थी ते आरडा ओरडा करीत येत आहेत, त्या अर्थी दोघी ही त्याना सापडलेल्या असाव्यात, असे उगाचच त्याला वाटू लागले.

घोड्यांच्या टापांचे आवाज थांबले. आणि सर्वजण गुहेच्या तोंडाशी आले असावेत, याची खात्री त्याला झाली. घाईघाईत तो डाव्या हातात मशाल घेऊन चालू लागला. फक्त एक माणूस कसाबसा जाईल अशी ती गुहा होती. आणि त्या गुहेतून दोन तरुणी सापडल्या या विचाराने खूष झालेला धोलासिंग चालू लागला.

अपयश घेऊन आपली माणसे आली असती तर इतका आवाज त्यांच्या तोंडून बाहेर पडलाच नसता, याची खात्री त्याला होती.

तो गुहेच्या तोंडाशी आला. आणि मशालींच्या उजेडात गुहेत येण्यासाठी पुढे सरसावणारे घोडेस्वार त्याला दिसले. एका घोडेस्वाराच्या पुढ्यांत एक तरुणी बसली होती. धोलासिंगाची नजर दुसऱ्या तरुणीचा वेध घेऊ लागली. पण कोणत्याही घोडेस्वाराजवळ ती नव्हती.

'भोला,' धोलासिंग ओरडला.

घाईघाईत एका तरुणाने आपला घोडा पुढे फेकला. तो त्या तुकडीचा नेता होता.

'भोला, दुसरी कुठं आहे?' धोलासिंगाने पूर्वीपेक्षाही कठोर

आवाजात विचारले.

'महाराज, ही एकत्र सापडली. आम्हाला पाहून पळून जाण्याचा प्रयत्न करीत होती.'

'कुठं होती ?'

'भिल्लांच्या वाड्यावर होती.' क्रूर चेहऱ्याचा भोला भीत भीत बोलला. तो अतिशय घाबरला होता. आपण या तरुणीला पकडून आणले, म्हणून आपला मालक आपल्यावर खूष झाला असेल असेच त्याला वाटत होते. पण आता त्याच्या त्या कल्पनेला तडा गेला होता. जराशी चूक केली म्हणून चौघाना कापून काढणारा आपला मालक त्याने पाहिला होता. रागाच्या भरात तो आपले शीर देखील खाली उतरून टाकील, याची भीती त्याच्या मनात उभी राहिली होती.

'महाराज, तिनं भिल्लांचा आसरा घेतला होता. दोन भिल्ल आम्हाला विरोध करण्याचा प्रयत्न करीत होते, पण आम्हाला पहाताच ते पळून गेले.'

'मग तुम्ही त्यांच्या मागावर का नाही गेलात, घोलासिंग कडाडला, आणि त्याने जळजळीत नजरेने भोलाकडे पाहिले. निश्चित असे काहीतरी घडणार आहे, याची कल्पना सर्वांना आली. आणि घाबरून भोलाने आपला घोडा मागे घेतला.

भोलाच्या चेहऱ्यावर मूर्तीमंत भीती उभी राहिली होती. आपण घोड्यावरच बसून राहिलो तर आपला मालक तो अपमान समजेल, ही भीती देखील त्याच्या मनात उभी राहिली होती.

थरथरत तो घोड्यावरून खाली उतरला. घोलासिगाच्या प्रश्नाचे उत्तर आपण देऊ शकणार नाही, याची कल्पना त्याला आली. स्वतःचा जीव वाचवण्यासाठी मालकाला कांहीतरी सांगणे भाग होते.

'भोला, दोन तरुणी पळालेल्या आहेत, याची तुला माहिती

होती. दोघीही एकत्र असतील याचीही कल्पना मी तुला दिली होती; मग येताना एकीला त्याच ठिकाणी सोडून तू परत का आलास ? खवळलेल्या आवाजात धोलासिंगने विचारले.

'महाराज, त्या ठिकाणी दुसरी तरुणी नव्हती.' भोलाने भीत भीत सांगितले.

'तू त्यांच्या वस्तीवर पाहिलं होतंस ?'

'नाही महाराज.'

'का ?'

'महाराज, ते भिल्ल अतिशय कडवे लढवय्ये आहेत, त्यांच्याशी आम्हाला चकमक करावी लागली असती.'

'मग करायची होतीस. हे काळं तोंड इथं घेऊन येताना तू याचा विचार करायला हवा होतास.'

'महाराज, आताही हवं तर मी जाईन.' भोलाने थरथरत्या आवाजात सांगितले. आणि धोलासिंगने कठोर डोळ्यांनी त्याच्याकडे एकवार रोखून पाहिले. धोलासिंगच्या डोळ्यातून अग्नीवर्षाव होत होता, त्याचा हात कमरेच्या तलवारीकडे गेला होता. हे वाक्य भोलाच्या तोंडून बाहेर पडले नसते तर कदाचित धोलासिंगच्या हातातील तलवार हवेत फिरली असती. भोलाचे शीर धडावेगळे होऊन कदाचित ते पायाखालच्या मातीत पडले असते.

भोला थोडक्यात वाचला. आपण त्याला एकवार संधी द्यावी, असे धोलासिंगला वाटले. त्याची कठोर नजर भोलाच्या सर्वांगावरून फिरली.

'जा, पण जाताना इतकी माणसे घेऊन जाऊ नकोस. फक्त सहा घोडेस्वार तुला देण्यात येतील.' धोलासिंगच्या कठोर वाणीने भोलाला समज दिली.

मृत्युला भीणारा भोला नव्हता. फक्त चूक झाली म्हणून मालकाच्या हातून कुत्र्याचे मरण आपल्याला येऊ नये. अशीच त्याची

इच्छा होती.

फक्त सहा घोडेस्वार त्याने स्वत:बरोबर घेतले. गुहेत जाऊन भरपूर दारुगोळा त्याने आपल्याबरोबर घेतला. शंभर सव्वाशे भिल्लांबरोबर लढणे ही सामान्य गोष्ट नाही. याची जाणीव त्याला होती.

आणि म्हणूनच गुहेपासून दूरदूर जाताना त्याची छाती धड-धडत होती. उगाचच भीतीने त्याच्या मनात घर केले होते. पण त्याच्या दृष्टीने एक समाधान त्याच्या मनात उभे राहिले होते. निदान आपण फुकाफुकी न मरता शेवटपर्यंत प्रयत्नांची शिकस्त करून मेलोच तर लढता लढता मरणार आहोत, आणि जगलोच तर यशस्वी होऊन परत येणार आहोत, हे त्याच्या दृष्टीने फार मोठे समाधान होते.

\+ \+ \+

चामुंडेच्या देवळांतील पुजारी अंधार असताना पहाड आणि जंगल तुडवीत चालला होता. डोळ्यांपुढचे दिसत नव्हते. तरीही मशाल त्याने बरोबर घेतली नव्हती.

तो संपूर्ण भाग त्याच्या पायाखालचा होता. त्याला दिसण्याची गरज नव्हती. कारण, त्याचे पाय नेटानें आपोआप हवे तसे चालत होते.

फटफटले आणि तो उग्र चेहऱ्याचा पुजारी भिल्लांच्या वाड्या-जवळ पोहोंचला. पठारावरून त्यानें दूरवर दिसणाऱ्या छोट्या छोट्या झोपड्यांकडे रोखून पाहीले.

कधी कुठेंही गावात न जाणारा तो पुजारी अधूनमधून भिल्लांच्या वाड्यावर मात्र येत होता. त्या लोकांत माणुसकी आहे, आणि ती माणसे माणसासारखी जगणारी आहेत, असेच तो पुजारी आतापर्यंत मानीत आला होता. जेव्हा त्या पुजाऱ्याने भिल्लांच्या गावात प्रवेश केला, तेव्हा त्या भिल्लांच्या कुत्र्यानीं एकच गलका

केला. कठोर चेहऱ्याचा तो पुजारी फक्त हसला. गलका करीत येणारी ती कुत्री आपल्याला पहाताच पुन्हा शांत पडतील, हे त्याला अनुभवावरून माहित होते. आणि झालेही तसेच. त्यांच्या रोखाने धावत आलेली कुत्री एकाएकी शांत झाली आणि पुजाऱ्याभोवती घोटाळू लागली.

त्याचवेळी पूर्वेकडच्या पठाराच्या बाजूने घोड्याच्या टापांचे आवाज जवळ जवळ येत आहेत, हे त्याच्या लक्षात आले. पण त्याचे त्याला काहीही वाटले नाही, शांतपणे तो आजुबाजूच्या झोपड्यांकडे पहात चालू लागला.

त्यातल्या त्यात एका चांगल्याशा झोपडीजवळ तो थांबला. दारातच एक म्हातारी कोयत्याने लाकडे कापीत होती. चामुंडेच्या पुजाऱ्याला पहाताच तिने कोयता तसाच टाकला आणि ती घाईघाईत घरात शिरली. थोड्याच वेळात एक रुंद देहाचा आणि क्रूर चेहऱ्याचा असा काळाकभिन्न असा भिल्लांचा राजा बाहेर आला. पुजाऱ्याला पहाताच त्याने अभिवादन केले. आणि अदबीने त्याला आत नेले.

पुजाऱ्याच्या तोंडून एकही शब्द बाहेर पडला नाही, कारण, त्याला बोलण्याची सवयच नव्हती. मोजकेच बोलण्याची त्याला सवय होती. आणि तेच तर त्याचे खरे वैशिष्ठ्य होते.

घाईघाईत त्या भिल्लाच्या मुलाने फुले आणून पुजाऱ्याच्या पायावर वाहिली. भिल्लाना परमेश्वराच्या जागी तो पुजारी होता. आपली सर्व दुःखे हा पुजारीच नाहीशी करतो. अशी त्यांची कल्पना होती.सूर्याच्या आगमनाबरोबर तो भिल्लांच्या गावात शिरला. याचाच अर्थ आज काहीतरी शुभ असे घडणार आहे, अशीच गावकऱ्यांची कल्पना झाली होती.

घोड्याच्या टापांचे आवाज आता जवळ आले होते. आणि हा हा म्हणता सात घोडेस्वार गावात शिरले होते.

गावात एकच खळबळ माजली. गोळीबारांचे आवाज करीत सर्व घोडेस्वार भिल्लांच्या राजाच्या झोपडी समोर येऊन उभे राहिले.

'संता, एका घोडेस्वाराने कठोर आवाजात हाक मारली. आत देवासमोर बसलेला भिल्लांचा राजा क्रोधाने थरथरत उठून उभा राहिला. आपल्याला इतक्या तुच्छ नावानें हाक मारणारा आहे तरी कोण, हेच त्याला पहायचे होते.

संता बाहेर आला, क्रोधाने थरथरत तो दारात येऊन घोडे-स्वाराकडे पहात उभा राहिला. त्याने दोन्ही हात कमरेवर ठेवले होते.

'कोण आहे ?' संताने कठोर आवाजात विचारले. आपल्या-वर बंदुका रोखलेल्या आहेत याची जाणीव त्याला होती. पण आप-ल्यावर गोळी झाडून यातील कुणीही जिवंत परत जाणार नाही. याची खात्री त्याला होती. मरणाला भिणारे ते रक्त नव्हते.

'संता, तुझ्या माणसानी या गावात एक बाई आणलेलीं आहे. कठोर आवाजात एका घोडेस्वाराने सांगितले. आणि संताने धनुष्य-बाण घेऊन सभोवताली जमलेल्या गावकऱ्यावरून नजर फिरवली.

'या ठिकाणी कोणतीही स्त्री आणलेली नाही, रानात चुक-लेली एक बाई माझी माणस घेऊन येत असताना, रात्री कुणीतरीं माझ्या माणसावर हल्ला केला होता, तो तूच तर नाही ना ?' संताचा आवाज बराच उतरला होता.

आणि त्याचवेळी चामुंडेचा पुजारी शांतपणे येऊन त्या घोडे-स्वाराच्या पुढ्यात उभा राहिला. त्याचे लालभडक आणि कठोर डोळे त्यांच्यावर रोखलेले होते, त्या पुजाऱ्याला पहाताच सर्वांच्या बंदुका झटक्यांत खाली गेल्या होत्या.

'कधीकधी तू माझ्या मंदीरांत येतोस.' त्या पुजाऱ्याने कठोर आवाजात विचारले.

'होय महाराज.' मान खालीत घालीत त्या घोडेस्वाराने उत्तर दिले. आणि सर्व घोडेस्वाराना खाली उतरण्याचा त्या पुजाऱ्याने हुकूम सोडला. आलेली मंडळी आपल्या देवाला घाबरतात हे पाहून ते भिल्ल आश्चर्यचकीत झाले होते. अभिमानानें त्याचा ऊर फुटून आला होता.

'तुला काय हवं ?' कठोर आवाजात पुजाऱ्याने खाली उतरलेल्या त्या घोडेस्वाराला विचारले, आणि जळजळीत नजरेने त्याच्याकडे पाहिले.

'महाराज आमची एक स्त्री रस्ता चुकली होती. तिला भिल्लानी पळवून आणलं, असं मी ऐकलं. त्या घोडेस्वराने भीत भीत सांगितले. खरे सांगितले नाहीतर हा पुजारी नजरेनेच आपले भस्म करून टाकील याची खात्री या सातही जणाना होती.

'संता, हा म्हणतो ते खरं आहे ?'

'नाही महाराज. माझ्या माणसानी कोणत्याही स्त्रीला पळवून आणलेलं नाही.' घोडेस्वारांकडे खाऊ का गिळू अशा नजरेने पहाणाऱ्या संताने नम्रतेने सांगितले. भिल्लांचा हा राजा आपल्याकडें कधीही खोटे बोलणार नाही, याची खात्री चामुंडेंच्या पुजाऱ्याला होती.

'तू ज्या स्त्रीच्या शोधात आहेस, ती स्त्री या ठिकाणी नाहीं, या गावातील कोणताही माणूस माझ्याकडे कधीही खोटं बोलणार नाही.' तो म्हातारा पुजारी कठोर आवाजात बोलत होता.

'महाराज, आम्ही चुकून या गावात आलो. आम्हाला क्षमा असावी.' खालच्या मानेनेच त्याने सारवासारव केली. आणि तो पुजाऱ्याला साष्टांग नमस्कार घालून आपल्या घोड्यावर स्वार झाला. त्याचेच अनुकरण त्याच्या इतर सहकाऱ्यांनी देखील केले.

सातही घोडेस्वार धूळ फेकीत तिथून निघाले, तेव्हा पुजारी आणि भिल्लांचा राजा त्यांच्याकडे रोखून पहात होते.

पण त्या पुजाऱ्याचे डोळे वेगळ्याच तेजाने चमकत होते. विचा

रांचा गोंधळ त्यांच्या मनात सुरू झालेला आहे, हे हुशार संताच्या लगेच लक्षात आले होते.

काही औषधी मुळी घेऊन तो पुजारी निघाला, तेव्हा सूर्य वर चालला होता. आणि कोवळे वाटणारे ऊन आता तापू लागले होते.



## सहा

दोन दिवसात उदयसिंह चौहानाने बरीच माहिती मिळवली होती. एकंदर तीन दरोडे आसपास घातले गेले होते आणि तिन्ही दरोड्यांच्या वेळी स्त्रियांना पळविण्यात आले होते, हे उदयच्या लक्षात येऊन चुकले होते.

त्यातील एक स्त्री म्हणजे डॉक्टर रामपाल तिवारींची मुलगी रत्ना होती. दुसरी अत्यंत गरीब अशी पण दिसायला सुंदर होती. तिसरी स्त्री मुंगा नावाच्या अगदी लहान खेड्यातील जमीनदाराची एकुलती एक स्त्री. तिचे नुकतेच लग्न झाले होते.

ज्याने स्त्रिया पळवल्या तो स्त्रीवेडा तर नाही ना, अशीच शंका त्याच्या मनात उभी राहिली होती. रत्नासाठी तो सारखा तळमळत होता. दरोडेखोरानी तिचे काय केले असेल हेच उदयसिंहाच्या डोक्यात शिरत नव्हते.

त्याने पटणी गावाच्या पूर्वेकडच्या छानदार आणि वावरण्याला अत्यंत अवघड अशा भागाकडे आपले लक्ष पुरवले होते. तिन्ही दरोडे याच भागाच्या सभोवताली घालण्यात आले होते.

करौलीच्या जंगलापेक्षाही अवघड अशी जागा होती ती. दरोडेखोराना ते एक वरदानच होते. त्या परिसरातील दोन्ही देवळे दरोडेखोरांनीच ताब्यात घेतली आहेत की काय, हेही त्याला पाह्यचे होते.

आपल्याजवळचे कानातील डूल त्याने रामपाल तिवारीना दाखवले होते आणि ते पाहून त्याना फार मोठा धक्का बसला होता. ते डूल रत्नाचेच आहेत हे त्यानी सांगितले होते. डॉक्टरांची तब्येत आणखीनच त्या घटनेने बिघडली होती.

त्यानी धसकाच घेतला होता. तिच्या कानातील डूल सापडले याचाच अर्थ ती जिवंत नाही, असाच त्यानी घेतला होता. उदयचा शब्ददेखील ऐकून घेण्याची त्यांची इच्छा नव्हती.

'हरिहर, चामुंडेच्या देवळातच काहीतरी गडबड असावी.' उदय खेदाने स्वतःशीच पुटपुटल्यागत बोलत होता. बसल्याबसल्या त्याने गवताच्या काड्या तोडायला आरंभ केला होता.

आणि हरिहर पाली शांतपणे ते ऐकत होता. त्याने अद्याप एक शब्द देखील उच्चारला नव्हता. दरोडेखोरांचा मागमूसही लागू नये याचे आश्चर्य आणि धक्का हरिहरला बसला होता. आतापर्यंत उदयसिंह चौहानाबरोबर त्याने अनेक कामगिऱ्यांत भाग घेतला होता, पण अशी डोके खाणारी कामगिरी मात्र त्याना अगदी प्रथमच भेटली होती.

घोड्यांच्या टापांचाही मागमूस लागत नव्हता. ज्या स्त्रिया पळवल्या गेल्या त्यांचाही काही मागामूस नव्हता. सापडले होते ते एक रत्नाच्या कानातील डूल आणि तेही उघडउघड चामुंडेच्या देवळासमोर.

पण तेवढयावरून चामुंडेच्या पुजाऱ्याच्या मागे लागणे उदय-सिंहाप्रमाणेच हरिहर पालीला देखील धोक्याचे वाटत होते.

कारण, तो पुजारी फार मोठा तपस्वी आहे, अशी त्याची ख्याती होती, मंत्र विद्येतही त्याचा हातखंडा होता, पण तो विद्या तो फक्त एकाद्याच्या भल्यासाठीच उपयोगात आणीत असतो, असेही त्यांच्याबद्दल सांगण्यात येत होते.

एकदा तर त्या पुजाऱ्याने एका दुष्ट माणसाचे केवळ तेजानेच जाळून भस्म केले होते. अशी एक अफवा देखील त्याच्या बाबतीत पसरली होती हे सर्व गृहीत धरूनच चौहानाचे मन कचरत होते.

शिवाय त्याने प्रत्यक्ष त्या पुजाऱ्याला पाहिले होते. तो अति-शय कठोर वाटत असला तरी अत्यंत कोमल हृदयाचा असावा, अशी त्याची समजूत झाली होती, पण त्याचबरोबर नकळत चामुंडेच्या देव-ळाच्या आसपास काहीतरी घडत असावे, असे मात्र त्याला सारख राहून राहून वाटत होते.

'हरिहर, आपल्याला निघायला हवं.' उदयसिंह चौहानाच्या तोंडून एकाएकी शब्द बाहेर पडले. चौहानाच्या डोक्यांत काहीतरी कल्पना आली असावी हे हरिहरच्या लक्षात येऊन चुकले.

'कुठं ?'

'मंदीराच्या जवळपास हरिहर. आपल्याला त्याच्या भागात भटकायला हवं तोच भाग आपल्याला नजरेतून चाळायला हवा. माझी खात्री आहे. मंदीराजवळच काहीतरी घडत असावं. दोन्ही मंदिराच्या मध्ये असलेल्या, अत्यंत अवघड अशा *डेकपारीतदरोडे खोरांचा तळ असावा, उदय गंभीरपणे बोलत होता.

हरिहर पाली कोणतेही मत प्रदर्शित करू शकत नव्हता. कारण हुकूमाबरहुकूम काम करायचे इतकेच त्याला माहित होते.

काही न बोलता हरिहर पाली उदयसिंहा बरोबर उठून उभा

राहिला. दोघेही घोड्यावर स्वार झाले, तेव्हा त्यांच्या तोंडून शब्द देखील बाहेर पडत नव्हता. हरिहर पाली वेगळाच विचार करीत होता. दरोडेखोरांशी गाठ पडली, तर आपण करायचे काय, हा विचार त्याच्या दृष्टीने महत्वाचे होता.

सूर्य माथ्यावर येण्यापूर्वीच दोघेही चामुंडेश्वराच्या देवळाजवळ आले. तिथून चामुंडेच्या देवळाकडे जायला फार मोठा वळसा घ्यावा लागत असे. पण दोघांनीही मधली दरी ओलांडून सरळ रेषेत जाण्याचा निर्णय घेतला होता.

उयदसिंह चौहान अतिशय सावध होता. लपून छपून दरोडेखोरानी हल्ला केला, तर स्वत:ला सावरणे आणि वाचवणे सोपे नाही, याची खूणगाठ देखील त्याने मनाशी बांधली. तापलेल्या उन्हात त्याची घारीची नजर चौफेर फिरत होती.

'हरिहर, दरोडेखोराना दडण्यासाठी अशी दुसरी जागा ह्या भागात नाही.' तशाही परिस्थितीत उदय हरिहर पालीला त्या भागाची माहिती करून देत होता. आणि मनावरचे दडपण वाढलेला हरिहर पाली मुकाट्याने ते ऐकत होता.

'हरिहर, दरोडेखोना इथे दडी मारता येते. फक्त त्याना घोड्यांचा वापर करता येईल की, नाही याचीच मला शंका वाटते.' त्याच्या अवाजातून चिंतेचा सूर डोकावत होता.

दरोडेखोरांचा विचार करताना आपले घोडे घेऊन त्या भागातून जाता येईल की नाही, याचाच विचार त्याच्या डोक्यांत घोळत होता. आणि म्हणूनच जर का त्या भागात दरोडेखोर असतील तर ते कोणत्या भागातून खाली दरीत उतरत असतील याचाही विचार तो त्यावेळी करीत होता.

उदयच्या सराईत नजरेने पहाडीत उतरण्याच्या अनेक वाटा हेरल्या होत्या. पण आपल्यासह दोन्ही घोडे खाली उतरतील की नाही याची शंका त्याच्या मनात उभी राहिली होती.

'हरिहर, या भागातून घोड्यासह उतरण्याचं तू धैर्य करशील? बोटाने एक अत्यंत अवघड असा उतार हरिहरला दाखवत उदयने विचारले. आणि तो जीवघेणा उतार पाहून हरिहर पालीचे शरीर शहारल्यासारखे झाले. आपला घोडा हा उतार उतरून जाईल की नाही, याची शंका त्याच्या मनात उभी राहिली.

'हरिहर, तू घाबरलास?' उदयने कठोर आवाजात विचारले. हरिहर जर घाबरला असेल तर त्याचा कोणताही दोष नाही, हाच विचार उदय करीत होता.

'नाही, मी घाबरलो नाही, माझा घोडा माझ्यासह खाली कोसळला तरी मला त्याची पर्वा नाही. मी फक्त घाबरतो तुमच्या घोड्याच्या बाबतीत. हरिहर पालीने गंभीर आवाजात सांगितले. मनातून तो घाबरला होता. कोणत्याही परिस्थितीत दोन्ही घोडे खालीपर्यंत जाऊ शकणार नाहीत, याची खात्री त्याचे मन त्याला पटवीत होते.

उदय काहीच बोलला नाही. हरिहर पालीच्या मनात उभी राहिलेली भीती त्याने ओळखली होती. आणि म्हणूनच काही न बोलता खाली उतरण्याचा निर्णय त्याने घेतला होता.

घोडे मागे ठेवायलाही त्याची तयारी नव्हती. कारण, आपण याच वाटेने परत येऊ की नाही, याचीच त्याला शंका होती आणि आलो तरी आपले घोडे सुरक्षित राहातील की नाही, ही भीती देखील त्याच्या मनात उभी राहिली होती.

उदयची पंचकल्याणी घोडी त्या जीवघेण्या उताराजवळ आली. पण मुळीच बिचकली नाही. आपल्या मालकाला सुरक्षितपणे या दरीत न्यायचे आहे, हे त्या मुक्या जनावराने ओळखले होते. शांतपणे ती स्वतःला सावरीत आणि उतारावर खूर नीट रोवीत खाली खाली उतरु लागली.

पण हरिहर पालीचा घोडा मात्र बिचकल्यासारखा झाला. हरिहर पालीने लगाम ओढून केलेले हुकूम त्याच्या लक्षात आले

नसावेत. वर बसलेला हरिहर पाली चिडलेला आहे, हे उदयने ओळखले.

' हरिहर, घाई करू नकोस. ' उदयने ओरडून सांगितले.

' हा उतरायला तयार नाही. '

' थोडा धीर धर. चकोरीकडे पाहून त्याच्या मनाची तयारी होईल. तू शांत बसून रहा. ' उदयने वर मान करून हरिहरकडे पहात सांगितले.

पण उदय हरिहरसाठी थांबला नाही. चकोरी बेधडक कोणतीही भीती मनात न बाळगता खाली खाली उतरत होती. आणि खूष झालेला उदयसिंह चौहान हात वर करून कोणताही धोका नाही हे हरिहर पालीला सांगण्याचा प्रयत्न करीत होता.

अखेर हरिहर पालीने देखील हालचाल केलीच. सरळ घोड्यावरून तो खाली उतरला. आणि घोड्याचा लगाम हातात धरून तो जीवघेणा तार उतरू लागला.

दोघेही खाली उतरले. तेव्हा अतिशय थकल्यासारखे झाले होते. खाली उतरताना मनावर पडलेले दडपण एकाएकी नाहीसे झाल्यामुळे त्यांची ही अशी अवस्था झाली असावी.

' हरिहर, आपण जिंकली.' उदय खूष होऊन म्हणाला. पुढे काय होईल ते होईल. आपण ती जिवघेणी दरी गाठली याचे समाधान त्याच्या मनावर झळकत होते.

आणि हरिहर पाली मात्र सुन्न होऊन सभोवताली मान वर करून पहात होता.

चारीबाजूनी डोंगराने ते घेरल्यासारखे उभे होते. दरोडेखोरानी जर आपल्याला अशा ठिकाणी गाठले, तर आपण कोणत्याही परिस्थितीत इथून सुटू शकणार नाही, याची खात्री हरिहरला झाली होती. पण उदयला ते बोलून दाखवण्याचे धैर्य त्याला होत नव्हते.

खूष झालेला उदय जेव्हा गंभीर बनला, तेव्हा हरिहर पाली-

देखील सावध झाला. उदयच्या नजरेने काहीतरी हेरलेले असावे याची कल्पना हरिहरला झाली.

उदयची नजर पूर्वेकडच्या बाजूला उतारावर लागली होती. त्या बाजूला गर्द झाडी झुडपात काहीतरी हालल्याचे हरिहर पालीला देखील जाणवले असावे.

' हरिहर, आपल्यावर कुणाची तरी नजर आहे.' उदयने हलक्या आवाजात सांगितले. आपल्याला आता काहीतरी हालचाल करायला मिळणार या भावनेने त्याची नजर चकाकत होती.

' वरून आपल्यावर हल्ला होण्याची शक्यता दिसते.' काहीतरी बोलावे म्हणून हरिहर पाली बोलून गेला. पण त्याच्या डोक्यांत वेगळेच विचार घोळत होते. वरून हल्ला झालाच तर आपण स्वतःचे संरक्षण करून घेऊ शकणार नाही, हीच भावना त्याच्या मनात घर करून राहिली होती.

' हरिहर, या भागात गुहा असाव्यात. आणि दरीत न उतरताही दरीतील गुहामध्ये प्रवेश करण्याचा एखादा मार्ग असावा, उदयसिंह चौहान अतिशय गंभीर बनून बोलत होता. त्याचे डोळे चिंतातूर बनले होते. आणि आवाज दबल्यासारखा वाटत होता.

' चौहान, आपण त्यांच्या हल्ल्याची वाट पाहिलेली बरी.'

' का, आपणच त्यांच्यावर हल्ला केला तर बिघडणार आहे काय ?' उदयने आपला आवाज किंचित चढवीत विचारले.

' त्याना संधी मिळेल आणि आपल्या हालचाली पाहुन त्याना सावधगिरी बाळगता येईल.' हरिहर पाली गंभीर होत बोलला. उदयसिंह चौहान आपले कितपत ऐकेल याचाच विचार तो सध्या करीत होता.

आणि त्याचवेळी वरून गोळीबाराचा आवाज त्यांच्या कानात शिरला होता.

एकतर तो गोळीबार हवेत झाला असावा किंवा ती गोळी

आपल्या रोखाने झाडण्यात आली असावी. पण ती गोळी आपट-ल्याचा मागमूसही उदयला लागला नव्हता. त्या गोळीने त्याच्यावर कोणताही परिणाम झाला नव्हता. इतक्या दुरून आपल्यावर गोळी झाडून ते आपल्यावर हल्ला करतील हे त्याला पटणेच अशक्य नव्हते.

उदयला हल्ला करण्याची घाई नव्हती. रत्नाला पळवणारे दरोडेखोर जर याच भागात रहात असले, तर त्याना शोधून काढ-ण्याचे काम त्याना करायचे होते. सर्वात प्रथम रत्नाला त्यांच्या हातून सोडवायचे होते.

इतक्या दिवसा उजेडी आपण जर दरोडेखोरांवर हल्ला कर-ण्याचा प्रयत्न केला, तर आपल्याला धोका झाल्याशिवाय रहाणार नाही, हे त्याला पटले होते. म्हणूनच तो संध्याकाळ होण्याची वाट पहात होता. एकदा का रात्र झाली तर दरोडेखोरांच्या माऱ्याला सरळ सरळ तोंड देता येणार होते. आणि चोरटया हालचाली करून दरोडेखोरांचा तळ शोधून काढता येणार होता.

'हरिहर, आपल्याला रात्र होईपर्यंत काहीही करता येणार नाही.' उदय थंडपणे बोलला आणि आपल्या घोडीचा लगाम धरून झुडपाच्या रोखाने चालू लागला.

त्याचवेळी त्याने बाजूला उडी घेतली. कारण, दोघांच्याही रोखाने तुफान गोळीबार सुरू झाला होता.





## सात

घोलसिंग पवनार पराभवाच्या कल्पनेने पार चिडून गेला होता. हात हलवीत परत आलेल्या भोलाकडे तो क्रोधाने थरथरत पहात होता. त्याचे मस्तक भणाणून गेले होते.

'महाराज ती नाही,' त्याने चवताळून कठोर आवाजात विचारले, आणि कमरेच्या तलवारीला हात घातला. आपण जर योग्य वेळी काही हालचाल केली नाही, किंवा आपल्या समोरच्या राक्षसाची समजूत घातली नाही, तर तो आपले शीर धडावेगळे केल्याशिवाय रहाणार नाही, याची कल्पना भोलाला येऊन चुकली होती.

'भोला, हेच सांगायला तू काळं तोंड घेऊन परत आलास ?' पवनारने थरथरत्या आवाजात विचारले, आणि आधीच घाबरलेला भोला, अक्षरश: थरथर कापू लागला.

'महाराज, मी भिल्लांच्या वाड्यावर गेलो, त्या ठिकाणी एकच स्त्री आपण पाहिल्याचं भिल्लांनी सांगितलं.' भोला स्वत:ला सावरीत कसाबसा बोलला. आणि घोलासिंगाचे भडकलेले माथे एकाएकी शांत झाले.

आतापर्यंत भडकलेले माथे ठेवल्यामुळेच आपले नुकसान झाले, असेच तो समजत होता, यापुढे तरी शांतपणाने प्रत्येक निर्णय घ्यावा हा विचार त्याने अगदी योग्यवेळी केला होता. एकाएकी आपला मालक शांत झालेला पाहून सभोवतालच्या दरोडेखोराना आश्चर्याचा धक्का बसला होता.

'भोला, तुझ्या कामाला जा.' थंडपणे धोलासिंगाच्या तोंडून शब्द बाहेर पडले. आपला मालक एकाएकी शांत झालेला पाहून वेगळीच भीती त्याच्या मनात घर करून राहिली. जड पावलानी तो तिथून पुढे निघाला. आपल्या गुहेत शिरला तेव्हा त्याची छाती अनामिक भीतीने धडधडत होती.

मशाल घेऊन धोलासिंग भुयारातून चालत होता. त्याच्या डोळयांपुढे पकडून आणलेली कैदी स्त्री उभी होती. भीतीने तिची दातखिळी बसल्यासारखी झाली होती.

धोलासिंग गुहेच्या एका चिचोळया दाराजवळ थांबला. त्या ठिकाणी एक दरोडेखोर पहारा करीत उभा होता. त्याच्याकडे लक्ष न देता डाव्या हातातील मशाल दगडाच्या एका खोबणीत खोऊन तो आत शिरला. दोघी कैदी स्त्रिया भयभीत नजरेने त्याच्याकडे पाहू लागल्या. दोघींच्याही डोळयातून दयेची याचना व्यक्त होत होती.

त्या गुहेत येताना अतिशय विचार करून तो आला होता. ही परिस्थिती धूर्तपणाने हाताळली तर आपण बऱ्याच गोष्टीत यश मिळवू शकू हाच विचार त्याने केला होता.

'पोरी, घाबरु नकोस, तुला जसं माझ्या लोकानी आणलं तसं

गावात पोहचवलं जाईल.' त्याने थंड पण पहाडी आवाजात तिची समजूत घालायला सुरुवात केली. त्याचा आवाज प्रेमळ बनला होता. पण पटणीतून पळवून आणलेल्या त्या स्त्रीच्या तोंडून एकही शब्द बाहेर फुटला नाही. तिचे डोळे चलबिचल बनले होते. धोलासिंगाच्या शब्दानी तिच्या डोळ्यांतील चंचलता आणि अविश्वास अधिकच वाढला होता.

तिला बरीच काही माहिती असावी असे धूर्त धोलासिंगाला वाटत होते. डॉक्टरांच्या मुलीविषयी तीच काय ते सांगू शकेल याची त्याला खात्री होती.

दमदाटी देऊन ती वळणार नाही, आणि आपणाला काहीही सांगू शकणार नाही, याची कल्पना त्याला येऊन चुकली होती. यापूर्वी तो जितका चढला होता तितकाच शांत झाला होता. आल्या परिस्थितीचा अत्यंत गंभीरपणे तो विचार करीत होता. आपण तिच्या मनात अशा निर्माण केल्या, गावात नेऊन सोडतो, असे तिला ठामपणे सांगितले तर कदाचित ती बोलू लागेल, अशी आशा त्याच्या मनात निर्माण झाली होती

तिची बसलेली दातखिळ सुटायला आपण आपले डोके शांत ठेवले पाहिजे, हाच विचार त्याच्या डोळ्यांत घोळत होता.

'तुला या ठिकाणी कोणताही धोका होणार नाही, तुझ्या अंगाला देखील हात लावण्याचे सामर्थ्य इथे कुणात नाही. तुला जर मुलात, आपल्या घरात जायचं असेल, तर बोलायला हवं.' धोलासिंग पवनारने गंभीर आवाजात बोलायला सुरुवात केली. त्याचा सूर अतिशय प्रेमळ होता. त्याचे डोळे पूर्णपणे निवळले होते. चेहऱ्यावर सदोदित दिसणारा क्रोध नाहीसा झाला होता.

आपण बोलल्या बरोबर ती एकाएकी तोंड उघडील अशी त्याची अपेक्षा नव्हती. धीर धरायला हवा हे त्याला पटत होते. आणि खरोखरच ती बोलत असेल तर कितीही काळ धीर धरायची त्याची

तयारी होती.

'मला माहित आहे, तुला लवकरात लवकर मुलाना भेटायला हवं. आपल्या लोकात जायला हवं. खरोखरच तुला जर जायचं असेल तर तू बोलायला हवंस. मी काही विचारीन त्याचे जबाब मला मिळायला हवेत.' बराच वेळ थांबून धोलासिंग पवनार बोलला.

तिच्या मनातील भीती हळूहळू कमी होत आहे, याची जाणीव धोलासिंगला झाली. तिचे डोळेही आता निवळत चालल्याचे दिसले.

'मला...घरी सोडणार ?' चाचरत चाचरत ती बोलली. तिच्या डोळयांत आणि आवाजात देखील, अविश्वासाची भावना प्रतित होत होती.

पण त्याचा परिणाम धोलासिंगावर अधिक झाला होता. ती बोलली हेच त्याच्या दृष्टीने फार मोठे समाधान होते.

'तुम्ही दोघीही एकाच वेळी पळून गेलात ना ?' धोलासिंगाने गंभीर होत विचारले. मनात नसून देखील तो नकळत गंभीर बनला होता. पण बोलण्याऐवजी ती आणखीनच घाबरलेली त्याला दिसली.

'तू मुळीच घाबरू नकोस. तुम्ही इथून पळाल्यापासून तो परत येईपर्यंत, जे जे घडलं ते ते मला कळायला हवं. तू जर नीट सांगितलंस तरच मी तुला सोडून देईन. नाही बोललीस तर इथल्या इथंच तुला शिक्षा करण्यात येईल.' धोलासिंगाचा स्वतःवरचा ताबा उडाला पूर्वीसारखाच तो क्रुद्ध बनला. त्याचे डोळे पूर्वीसारखेच लालभडक दिसू लागले.

आणि पूर्वीसारखीच ती घाबरल्यासारखी झाली. आपल्या हातून काही चूक तर झाली नाही ना, असे उगाचच तिला वाटू लागले.

कितीतरी वेळ तो शांत होता. तिच्या बोलण्याची अपेक्षा करीत होता.

'ती मेली.' थरथरत्या आवाजात त्या स्त्रीने सांगितले. आणि चमकून तो त्या स्त्रीच्या तोंडाकडे पहातच राहिला. त्याला फार मोठा धक्का बसला होता. इतक्या प्रयासाने आणलेला बळी देवाला देण्यापूर्वीच मेला, ही घटना त्याच्या दृष्टीने भयंकर होती. क्रोधाने आणि भीतीने देखील त्याचे हृदय थरारले गेले. शरीर कंप पावू लागले. चमत्कारिक नजरेने तो त्या स्त्रीकडे पहातच राहिला. किती तरी वेळ तो नुसता वेडा बनला होता.

'तू हे खरं सांगतेस ?' धोलासिंगाच्या तोंडून कसेबसे शब्द बाहेर पडले. आणि चमकून तिने धोलासिंगाच्या चेहऱ्याकडे पाहिले. भीतीने तिचा नुसता थरकाप उडाला होता. हा राक्षस आपले काहीही करील ही भीती तिला सारखी भेडसावीत होती.

'हो, आम्ही धावता धावता ती पाय घसरून खाली पडली. त्यावेळी एक साधू आम्हाला पकडायला धावत येत होता.'

'साधू ?' तो ओरडला.

'हो.'

'तो कसा होता सांग पाहू ?' आपला चढलेला पारा एकाएकी खाली आणीत धोलासिंगाने सांगितले. आणि घाबरलेल्या त्या स्त्रीला दिलासा आल्यासारखे वाटले. आपण जर नीट बोलले नाही तर आपली सुटका होणार नाही, याची खात्री तिला पटली, आणि धीर करून सर्वकाही सांगण्याचा निश्चय तिने मनाशी केला. कारण टाहो फोडून रडणारी तान्ही मुलं तिच्या डोळपुढे उभी राहिली होती.

'तो चामुंडेच्या देवळात असतो.' तिच्या तोंडून शब्द बाहेर पडले.

'तू त्याला कधी देवळात पाहिलं होतंस ?'

'हो, जत्रा असली की आम्ही तिथे येतो.' ती बोलली. आणि त्याचे डोळे पुन्हा चढल्यासारखे झाले. निघून जाणाऱ्या धोलासिंगला तिने घाबरून काहीतरी विचारले आणि लक्ष न देता तो मशाल

उपसून घेऊन तिथून निघाला. आता तिच्याकडे लक्षही देण्याचं त्याला कारण नव्हते.

त्याच्या डोळयांपुढे सारखा तो पुजारी येत होता. त्या पुजाऱ्याची संपूर्ण माहिती त्याला होती. पण तो कोण हे मात्र तो सांगू शकत नव्हता. यात भाग घेण्याचा त्याचा उद्देश काय ? हेच मुळी त्याला समजत नव्हते.

ती खरोखरच मेली की जिवंत आहे. हे त्या पुजाऱ्याला भेटल्या-शिवाय सांगता येणार नव्हते. शिवाय आपल्या देवाचा आपल्यावर कोप आहे, की काय याचाही कौल त्याला चामुंडेच्या देवळात घेता येणार होता.

चामुंडेश्वराचा तो निस्सिम भक्त असला तरी चामुंडेवर-देखील त्याची भक्ती होती. अनेकदा तो कौल घेण्यासाठी तिथे गेला होता. आपण जयपूरचे एक सरदार आहोत. असेच तो चामुंडेच्या पुजाऱ्याला सांगत आला होता.

मनात विचार येताच त्याने ते अंमलातही आणले होते. भरा-भर तयारी करून त्याने आपला घोडा फेकला होता. चामुंडेच्या मंदीरात जाण्यासाठी बळी देण्यासाठी आणलेल्या मुलीचे काय झाले, झाले हे पहाण्यासाठी. त्यावेळी त्याच्याबरोबर कुणीही नव्हते.

×                    ×

जेव्हा एकाएकी त्या झाडीतून गोळीबाराला सुरुवात झाली, तेव्हा हरिहर पाली उदयसिंह चौहानापासून बराच मागे होता, गोळीबार होतो आहे, हे समजताच त्याने घोड्याला मागे पिटाळले होते, आणि जमिनीवर लोळण घेतली होती.

पण उदयसिंह चौहानाने वेगळाच पवित्रा घेतला होता. त्याने चाकोरीला सोडून त्याने उलट्या सुलट्या उड्या घेत गोळीबार होणाऱ्या झाडीच्या रोखाने पुढे जायला सुरु-वात केली. समोरून होणाऱ्या गोळीबाराने त्याला फारसे काही

वाटले नाही. अशा प्रसंगाला तोंड देण्याची सवय त्याला नेहमीची होती.

कोणत्याही परिस्थितीत गोळीबार करणाऱ्याला सोडायचे नाही, हा निश्चयच त्याने केला होता. या प्रकाराने तो चिडला नव्हता, तर उलट उत्साहित बनला होता. या प्रकरणात भाग घेतल्या पासून हातांची रग जिरवता आली नव्हती. मुळमुळीतपणाचा त्याला कंटाळा आला होता.

आता आयतीच चालून आलेली संधी सोडायला तो तयार नव्हता निदान चारपाच मुडदे पडल्याशिवाय तरी त्याचे समाधान होणार नव्हते.

कोलांटच्या उड्या मारीत तो बाणासारखा झाडीत शिरला. उजव्या हातात त्याने जय्यत तयारीत पिस्तुल धरले होते. गोळीबार थांबला होता. आपला शत्रू भांबावलेला आहे, हे उदयने ओळखले होते.

पण तरीही बेसावधपणे एका जाग्यावर तो एक क्षणभरदेखील उभा राहिला नाही. माकडासारख्या उड्या मारणे चालूच होते.

लागोपाठ त्याने दोन दिशानी दोन गोळ्या झाडल्या. आपल्या गोळ्या फुकट जाणार नाहीत याची, खात्री त्याला होती. पहिल्या गोळीने कुणीतरी धडपडलेला त्याने ऐकला. तर दुसऱ्या गोळीनंतर एक भयानक किंकाळी अगदी जवळच त्याच्या कानी पडली.

तो खूष झाला. सुरुवात तर चांगली झाली होती. एखादा अर्धमेला सापडला तर बऱ्याच गोष्टी समजतील, असे त्याला वाटत होते. त्याचवेळी एका झुडपात सळसळ झालेली त्याने ऐकली आणि लागोपाठ दोन गोळ्या त्या दिशेने झाडल्या. खाली पडून कुणीतरी तडफडतो आहे, याची कल्पना त्याला आली. आणि जोरात ओरडून त्याने हरिहर पालीला हाक मारली.

आता त्याला कोणतीही भीती वाटत नव्हती. कुणीतरी आणखी

असलेच तर ते आपला अवतार पाहून पळून जाईल, याची खात्री त्याला होती. आणि म्हणूनच त्याने हरिहर पालीला हाक मारून बोलावले होते.

त्या ठिकाणी सूर्यप्रकाश अतिशय कमी येत होता. इतस्ततः पडलेली तीन प्रेते, त्याला दिसली होती. आपली एकादी तरी गोळी चुकायला हवी असेच त्याला वाटू लागले होते.

तिघेही ठार व्हायला नको होते. दरोडेखोरांचा ठावठिकाणा सांगण्यासाठी एकादा तरी जिवंत रहायला हवा होता. प्रेतांशी काही तो बोलू शकत नव्हता. एकाद्याच्या तरी शरीरात गरमपणा आहे की काय हे त्याने पाहिले. आणि तिन्ही मुडदे तसेच पडू देऊन तो आपल्याला पाहून हे दरोडेखोर कुठून खाली उतरले असावेत याचा अंदाज घेऊ लागला.

एक अत्यंत अवघड अशी मळलेली वाट त्याला दिसली, कदाचित त्याच वाटेने ते आले असावेत याची खात्री त्याला झाली.

आणि जर का यदाकदाचित घाबरून कुणी पळून गेले असलेच तर ते त्याच वाटेने पळून गेले असण्याचा खात्रीशीर संभव त्याला वाटत होता.

दोघेही आपल्या घोड्यांना घेऊन झुडूपास शिरले. उदयच्या दृष्टीने ती जागा अत्यंत मोक्याची होती. कुठूनही हल्ला झाला तर लगेच लक्षात येणार होते. आणि स्वतःचा बचाव करणे सोपे जाणार होते.

पहाडाच्या उतारावरून सर्वांत आधी त्यांच्यावर गोळी झाडण्यात आली होती. कदाचित त्याच भागातून हल्ला करणारे तिघेही दरोडेखोर आले असावेत, असे त्याला वाटत होते. अंधार पडला म्हणजे मग आपणाला मुक्तपणे हालचाली करता येतील, हा विचार करूनच बेलाशक विश्रांती घेण्यासाठी तो गवतावर आडवा झाला होता.

इतक्या लवकर आपल्यावर हुल्ला करण्याचे धैर्य दरोडेखोराना होईल यावर त्याचा विश्वास नव्हता.

त्याला फक्त एकच शंका भेडसावीत होती. आपल्याला या झुडूपात शिरताना उतारावरच्या दरोडेखोरानी पाहिले असावे, या भीतीने फक्त त्याचे डोळे बंद होत नव्हते.





## आठ

धोलासिंग पवनार संथपणे घोडा फेकीत आणि, दरीला फार मोठा वळसा घालीत चामुंडेच्या देवळासमोरील पहाडीवर पोहोचला. चामुंडेच्या देवळात जाणार आहोत या कल्पनेनेच त्याची छाती धडकू लागली होती. उगाचच त्याचे मन भयभीत बनू लागले होते.

चामुंडादेवीने यदाकदाचित कौल आपल्या विरुद्ध दिला तर आपले काय होईल, हाच विचार त्याला भेडसावीत होता. त्याच्या मनात खळबळ माजवून देत होता. कौल घेता घेताच त्याला पुजाऱ्याकडेही लक्ष द्यायचे होते. पण चामुंडादेवी इतकाच धसका त्याने पुजाऱ्याच्या बाबतीतही घेतला होता.

पुजाऱ्याने आपले जे एक सामर्थ्य निर्माण केलेले आहे, ते स मान्य नाही, याची कल्पना त्याला येऊन चुकली होती. त्या सामर्थ्याला आपण तडा पाहू शकणार नाही, याची खात्री त्याला पटली होती. चामुंडेचा तो पुजारी कापला तर किती भयंकर आहे, हे

देखील त्याने एकले होते. त्या पुजाऱ्याविरूद्ध दंड थोपटण्यात आपलेच नुकसान आहे, या जाणीवेने त्याचे शरीर थरथरू लागले होते.

संध्याकाळच्या उन्हात चकाकणारे ते पडक्या देवळाचे शिखर त्याने डोळ्यात साठवले. वेड्यासारखा कितीतरी वेळ तो त्या शिखराकडे पाहू लागला, आतापर्यंत या देवीकडे आपण अत्यंत भक्तीभावाने पाहिले, आता ही देवी माझ्याकडे कोपलेल्या अवस्थेत पहाणार नाही, असे त्याचे मन उगाचच ग्वाही देऊ लागले हळूहळू त्याचे मन मंदीरात जाण्यासाठी तयार होऊ लागले. संथपणें त्याचा घोडा तो उतार उतरू लागला. नकळतच थोड्याच वेळात जेव्हा तो मंदीराच्या दारात येऊन पोहोचला तेव्हा थक्क झाला होता.

देवीच्या मूर्तीसमोर दिवे जळत होते. होमकुंड धगधगत होते. आणि मंद दिव्यांच्या उजेडात नुकतीच पुजा बांधलेली आहे, हे स्पष्ट दिसत होते.

एकाएकी त्याच्या मनात आशा निर्माण झाली. आपण येण्यापूर्वीच पूजा झालेली आहे, ही शुभ घटना त्याला वाटत होती. आपल्याला कौल हवा तसा लागणार याची खात्री त्याला वाटत होती.

घोड्यावरून उतरून शांतपणे तो देवळाच्या पायऱ्या चढू लागला. पण अंत:करणातील धडधड काही कमी झाली नव्हती. मनातील भीती हळूच बिळातून सापाने डोके बाहेर काढावे, तशी मनात डोकावत होती. त्याची भिरभिरती नजर पुजाऱ्याला शोधीत होती.

भल्यामोठ्या प्रवेशद्वारातून आत शिरताच अभावितपणे त्याचा हात घंटा वाजवण्यासाठी वर गेला. आणि वरच्या वर थबकला. त्याचा हात थरथरत होता. घंटा वाजवण्याचे धैर्य त्याला होत नव्हते.

आपल्या मनाची ही अशी अवस्था का व्हावी हे त्याच्या लक्षात आले. नाही.

या पूर्वी असे कधीच घडले नव्हते. अनेकदा कौल घेण्यासाठी तो या देवळात आला होता. बेधडक खुल्या दिलाने आला होता. आणि हवातसा कौल लागताच भरलेल्या मनाने परत गेला होता. पण आता देवीसमोर जाऊन उभे रहाण्याचे धैर्य आपणात नाही, याची खंत त्याचे मन जाळीत होती. एकेक पाऊल टाकीत तो देवीसमोर भल्यामोठया समई जवळ उभा राहिला. देवीसमोर साष्टांग नमस्कार घालून उभे रहाताना आपली शक्ती नष्ट झाल्याचा आभास त्याच्या मनात निर्माण झाला. आपले शरीर कुणी आवळून तर धरीत नाही ना या जाणीवेने घाबरून त्याने आजुबाजूला पाहिले.

देवळाबाहेरचे जग अंधारात बुडून गेले, तरीही पुजारी त्याला दिसला नाही. मध्यरात्र उलटून गेली. तो येण्याचे चिन्ह दिसत नव्हते. पहाडासारख्या मनाचा धोलासिंग पवनार आता केळीच्या गाभ्या इतका मऊ पडला होता. वाघासारखे कठोर रोखलेले डोळे आता शेळीसारखे याचनेने भारले गेले होते. शरीराने तो जितका खचला होता तितकाच मनानेही.

आपली भवितव्याची भयाण चित्रे त्याच्या डोळयांपुढे भुतां-सारखी नाचत होती. आणि डोळयांत प्राण आणून तो वाट पहात होता केवळ पुजाऱ्याची.

मध्यरात्र उलटली. पहाट झाली. आणि त्याचे खचलेले मन अधिकच खचू लागले. मनातील भीती सारखी वाढत राहू लागली आणि आपला सपशेल पराभव होण्याचे तर हे चिन्ह नाही ना, याची जाणीव त्याच्या मनात जड होऊ लागली.

उजाडले. देवळाबाहेर लख्ख प्रकाश पडला आणि त्या प्रकाशात त्याचे मन हळूहळु सावध होऊ लागले. आपण उगाचच घाबरलो अशी भावना त्या मनात तयार होऊ लागली. पण अद्याप पुजारी

त्या ठिकाणी आला नव्हता. यापूर्वी असे कधीच घडले नव्हते.

एकाएकी कसली तरी आठवण त्याला झाली. हळूहळु तो भल्या मोठ्या घंटेखाली आला. यापूर्वी ज्या ज्या वेळी तो आला होता त्या त्या वेळी त्याच्यावर घंटा वाजवण्याचा प्रसंग आला होता. आणि तो घंटानाद ऐकूनच पुजारी देवळात आला होता.

शांत वातावरणात घंटानाद निनादला. उग्र चेहऱ्याच्या चामुंडेच्या भव्य मूर्तीवर त्याची नजर पडली. आपले आलेले धैर्य जात चालले आहे, याची जाणीव त्याला होऊ लागली. त्याच्या मनात उगाचच भीतीने घर केले. धैर्य आणण्यासाठी दोन्ही हात जोडून तो मूर्तीसमोर उभा राहिला.

' सरदार,' कठोर आवाजात उच्चारलेले शब्द त्याच्या कानात पडले. धोलासिंगाने दचकून आजूबाजुला पाहिले. दिवस असला तरी त्या ठिकाणी अंधार होता. भल्यामोठ्या समयातील तेल संपत आल्या मुळे त्या कशाबशा जळत होत्या. अंधुक उजेड फेकीत.

' सरदार, देवीला सर्व काही सांग. ' पुन्हा दुसरा पूर्वीसारखाच आवाज त्याच्या कानात शिरला. आणि धिप्पाड शरीराचा उग्र चेहऱ्याचा त्या देवीचा पुजारी हळुहळु पुढे आला. त्याच्या हातात तेलाचे भांडे होते. त्याचे तलवारीच्या अग्रांसारखे खुपणारे डोळे धोलासिंग पवनारच्या शरीरावरून फिरत होते.

' सरदार, तू जयपूरहून आलास ?' पुजाऱ्याचा आवाज आता सौम्य वाटत होता. धोलासिंगाच्या मनात धैर्य निर्माण करीत होता.

' होय महाराज. ' धोलासिंगाच्या तोंडून अभावितपणे शब्द बाहेर पडले.

' केव्हा ?'

' काल संध्याकाळी. ' धोलासिंगाच्या आवाजात त्या वातावरणाने एकदम फरक पडला होता. आपल्याला वाटली ती भीती

बाळगण्याचे कारण नाही, याची जाणीव त्याला झाली.

बोलता बोलताच पुजाऱ्याने सर्व समयात तेल घातले होते. बोटानीच वाती सारख्या केल्या होत्या. आणि विझलेले होमकुंडही पेटवले गेले होते. समयांच्या जळणाऱ्या वातीप्रमाणेच पुजाऱ्याचा चेहराही शांत दिसत होता.

' महाराज, मी संकटात आहे, हाती घेतलेलं काम पूर्ण होईल की नाही, याचीच शंका मला भेडसावते आहे.' दोन्ही हात जोडून धोलासिंग पुजाऱ्यासमोर उभा राहिला होता. आणि गंभीर आवाजात तो पुजाऱ्याला सांगत होता.

' सरदार, मी देव नाही, तुझ्यासारखाच एक माणूस. जे काय तुला सांगायचं असेल ते देवीला सांग. जे काय मनांत असेल ते सांग. पण खोटं बोलू नकोस. खरंखोटं कळण्याइतकं सामर्थ्य माझ्या देवीचं आहे '

पुजाऱ्याचा चेहरा पहाता पहाता उग्र बनला. चामुंडादेवीच्या चेहऱ्याचे तेज पुजाऱ्याच्या चेहऱ्यावर विराजमान झाले की काय, असा संभ्रम धोलासिंगाच्या मनात उभा राहिला. पळून गेलेल्या दुसऱ्या स्त्रीविषयी पुजाऱ्याला विचारण्याचा त्याचा मनोदय पूर्णपणे खलास झाला होता.

' महाराज, मला कौल हवा. माझा अपुरा राहिलेला संकल्प पुरा करण्यासाठी मला सामर्थ्य हवं.'

' सरदार, जरूर मिळेल. मात्र माझ्या देवीला चांगलं हवं, वाईट चालत नाही. कल्याणासाठी सामर्थ्य माग. जरूर मिळेल.' कठोर आवाजात पुजारी बोलला. आणि एकाएकी धोलासिंगाने चमकून त्या तपस्व्याच्या उग्र चेहऱ्याकडे पाहिले.

पुजाऱ्याच्या एकाच वाक्याने त्याचे हृदय हलले होते. आपल्या मनातील विचार त्याने ओळखले की काय ? आपण कोण आहे, हे त्याला समजले की काय ? आपण कोणता संकल्प सोडलेला आहे,

याचे ज्ञान त्या पुजाऱ्याला झालेले आहे की काय ? असे नाना प्रश्न धोलासिंगाच्या डोळ्यापुढे उभे राहिले. आपण उगाचच तर चामुंडेच्या देवळांत आलो नाही ना, अशी एक शंका त्याच्या मनाला भेडसावू लागली.

' महाराज, मी जो संकल्प सोडलेला आहे तो सद्हेतुने. माझा संकल्प पूर्ण झाला तर या मंदीरासमोर, चामुंडा मातेच्या पायाजवळ संपत्तीची रास उभी करीन. हे मंदीर नवं बांधून काढीन आणि...'

' थांब सरदार, भलत्याच वल्गना इथं करु नकोस. माझ्या देवीची कोणतीही अपेक्षा कुणाकडूनही नाही. माझ्या आईला जसं जे आहे, ते मंदिर शोभा देतं. तुला काय हवं ते माग आणि भक्ती मनाशी ठेऊन निघून जा.' पुजाऱ्याचा आवाज एकाएकी चढला. आधीच कठोर असलेला त्याचा आवाज आणखीनच कठोर बनला.

चाबकाचा फटकारा बसल्यासारखे धोलासिंगला झाले. आपले नेमके काय चुकले हे त्याच्या लक्षात आले. त्याने पुजाऱ्याची क्षमा मागितली, आणि दीनवाणा चेहरा करून शूर आणि उलटया काळजाचा धोलासिंग उभा राहिला.

' सरदार, आईला सर्व सांग. ती तुझ्या पाठीशी उभी राहील. सद्हेतूने तू एकदा संकल्प सोडला असशील तर ती तो पुरा करील.'

' धोलासिंग सावध झाला. इतरत्र भटकणारे आपले मन त्याने ताळ्यावर आणले. हात जोडून जेव्हा तो देवीजवळ उभा राहिला आणि मान वर करून देवीच्या उग्र चेहऱ्याकडे पाहिले, तेव्हा त्याची वाचा बसल्यासारखी झाली. तोंडातून शब्द देखील फुटेनासा झाला.

' देवी... माते, मी जो संकल्प सोडलेला आहे, त्याला अनंत अडचणी माझ्यासमोर उभ्या राहिलेल्या आहेत. चुकलेलं लेकरू समजून संकटातून पार पडण्याची शक्ती मला दे.' कसेबसे त्याच्या

तोंडून शब्द बाहेर पडले. त्यावेळी उग्र चेहऱ्याचा तो पुजारी फुलांच्या पाकळ्या पाण्यात बुडवून देवीच्या मूर्तीला लावीत होता. तोंडाने काहीतरी पुटपुटत होता.

आणि धोलसिंगाची नजर चामुंडेच्या उग्र डोळ्यावर खिळून राहिली होती. फार मोठा संघर्ष त्याच्या मनात उभा राहिला होता. आपल्या बाजूने देवी कौल देते, की आपल्या विरूद्ध देते, हाच विचार तो सध्या करीत होता. त्याचे हृदय धडधडत होते.

पण देवीच्या अंगावरची पाकळी खाली पडत नव्हती. काही-तरी चुकले होते... देवी आपल्यावर नाराज तर नाही ना, अशी एक शंका त्याच्या मनात उभी राहिली होती.

देवीच्या डाव्या अंगाची एक पाकळी खाली पडली आणि अनाहुतपणे पुजाऱ्याची मान नकारार्थी हलली. धोलसिंगाचे मन चरचरल्यासारखे झाले. आपल्या हातून काय चुकले हेच त्याच्या लक्षात येईनासे झाले. त्याचे डोके बथ्थड झाले होते.

' सरदार, देवीनं तुला कौल द्यायला नकार दिलेला आहे. कुणाच्या तरी प्राणांशी तू खेळ खेळतो आहेस, हाच त्याचा अर्थ आहे.' पुजाऱ्याचे कठोर डोळे त्याच्यावर रोखलेले होते. आणि उग्र चेहऱ्या-वर आता वेगळेच भाव दिसत होते.

' नाही महाराज. '

' मग जा. दुष्ट हेतूनं जर तू संकल्प सोडला नसशील, तर तो पुरा होईल. ' पुजाऱ्याने थंड सुरात पण कठोर आवाजात सांगितले. एका पानात पुजाऱ्याने गुंडाळून दिलेला प्रसाद स्वीकारताना त्याचा हात थरथरत होता. आपण महादेवाच्या विषाचा तर अंगीकार करीत नाही ना? हाच विचार त्याच्या डोळ्यांपुढे उभा राहिला होता.

घोड्यावर स्वार होऊन जेव्हा तो निघाला तेव्हा त्याचा उत्साह पूर्णपणे मावळला होता. संथपणे धावणाऱ्या घोड्यावर बसून

तो आपले सामर्थ्य एकवटण्याचा प्रयत्न करीत होता. गुपचूपपणे आपल्या मागून येणाऱ्या घोडेस्वारावर त्याचे लक्ष नव्हते.

संपूर्ण एक रात्र त्याने देवळात काढली होती.





## नऊ

अंधार पडला आणि उदयसिंह चौहानाने हालचाल करण्याचा निर्णय घेतला.

ज्यानी आपल्यावर गोळीबार केले होते ते कोण हे त्याच्या अद्याप लक्षात आले नव्हते. ते दरोडेखोर असावेत हे त्यांच्या वेषा-वरून स्पष्ट दिसत होते, पण तरीही त्याची खात्री होत नव्हती. तिन्ही प्रेते त्याच ठिकाणी टाकून ते निघाले होते. आणि दिवसा पाहिलेला अवघड चढ लख्ख चांदण्यात चढण्याचा ते प्रयत्न करीत होते. दोन्ही घोडे तो चढ चढतील की नाही, ही शंका आता उदयच्या देखील मनात उभी राहिली होती. आणि हरिहर पालीने तर विचार करायचेच सोडून दिले होते.

कसाबसा ते अर्धा चढ चढून गेले. आणि वरच्या बाजूला कुणाची तरी हालचाल त्यानी पाहिली. घाईघाईत कुणीतरी छोट्या झुडूपांच्या रोखाने जाताना त्याला दिसले होते. आणि त्याचवेळी

एक भलीमोठी शिळा गडगडत येताना त्याला दिसली होती.

फार मोठी धडपड त्यांच्या कानात शिरली आणि घाबरून बाजूला होण्याचा मार्ग ते शोधू लागले. पण त्यांचे सुदैव जोरावर होते. ती शिळा एकाएकी बाजूला वळली होती आणि बेधडक उदयच्या जवळून केवळ एका हाताचे अंतर राखून खाली गडगडत गेली होती. खालच्या बाजूला असलेला हरिहर पाली देखील थोडक्यात बचावला होता.

उदय चिडला. आपल्यावर हल्ला करणाऱ्याना जन्माचा धडा शिकवण्याचा त्याने निश्चय केला होता. घोडा त्याच ठिकाणी उभा करून कसाबसा तो वर चढू लागला. त्याने ज्या झुडूपात हालचाल पाहिली होती, त्या झुडूपात जाण्याचा निश्चय केला होता. गोळीबाराची भीती बाळगण्याचे त्याला काहीही कारण नव्हते.

मृत्यूची त्याला काहीही भीती वाटली नव्हती. आतापर्यंत तो मृत्यूशीच झुंजत आला होता. आणि यापुढे देखील मृत्युशी झुंजतच संपूर्ण आयुष्य तो घालवणार होता.

सरपटत घोरपडीसारखा तो चढ चढू लागला. अर्धे अंतर त्याने कापले असेल, नसेल तोच गोळयांचा पाऊस त्याच्या रोखाने बरसू लागला. एकूण एक गोळी त्याच्या अंगावरून पुढे जात होती. उदयने खाली वळून पाहिले हरिहर पाली दोन्ही घोडयांचे लगाम धरून बेधडक वर चढतच होता.

उदयने सरळ रेषेत झुडपाकडे न जाता पिछाडीला जाण्याचा विचार केला आणि किंचित डाव्या बाजूला वळून, तिरका वर सरकू लागला त्यावेळी त्याची नजर झुडपाजवळ होणाऱ्या हालचालींकडे लागली होती. आपल्या पिस्तुलाच्या टप्प्यांत ते झुडूप कसे येईल, याचाच विचार तो करीत होता.

अखेर त्याने मोठ्या प्रयासाने अर्धी अधिक पिछाडी गाठली. अधून मधून बाणदेखील सुसाटत त्याच्या रोखाने येत होते आणि

चवताळून उदय सरळ रेषेत पुढे सरकत होता. आपण जर नीट सावधगिरी बाळगली तर कोणतीही गोळी, आपले फारसे नुकसान करणार नाही, असेच त्याला वाटत होते.

अचानक त्याने गोळी झाडली. आता ते झुडूप गोळीबाराच्या टप्प्यात आले होते आणि हालचाल दिसताच झाडलेल्या पहिल्या गोळीने एक भयानक किंकाळी वातावरण भेदून गेली होती.

एकाएकी गोळीबाराला तोंड लागले. खाली गडगडत जाणाऱ्या एका दुष्मनाकडे पहात, वेडावाकडा सरकत आणखी पुढे आला. आपल्याजवळ गोळ्या कमी आहेत याची कल्पना त्याला होती. आणि म्हणूनच लक्ष्य समोर दिसल्याशिवाय गोळी झाडायची नाही. हा विचार त्याच्या डोक्यात घोळत होता.

लगेच त्याच्या पिस्तुलातून दुसरी गोळी सुटली आणि कुणीतरी गडगडत खाली जाताना त्याला दिसले. दोघेजण आपल्या गोळ्यानी ठार झाले, याची जाणीव होताच तो खूष झाला.

आतापर्यंत तो फत्ते होत आला होता. त्याच्या प्रत्येक गोळीने अचुक काम केले होते. या पुढची त्याची चिंता नष्ट झाली होती. कारण, त्याचवेळी त्याने तिसरी गोळी झाडली होती. कुणीतरी धड-पडल्याचा स्पष्ट आवाज त्याच्या कानात शिरला होता. आणि त्याच-वेळी झुडुपाच्या बाहेर येऊन बाण सोडणारा माणूस त्याने पाहिला होता. आणि ती संधी सोडण्याइतका उदय मूर्ख नव्हता. त्याने क्षणाचाही विलंब न लावता एकच गोळी डोक्याच्या रोखाने झाडली होती खाली पडता पडता त्या दरोडेखोराने सोडलेला बाण हवेत जाताना त्याने पाहिला होता.

दरोडेखोरांचे लक्ष आपल्यावर वेधल्यामुळे, हरिहर पालीकडे त्यांचे दुर्लक्ष झालेले आहे, हे त्याने ओळखले. कारण वर चढताना त्याला कोणताही प्रतिकार झाला नव्हता.

बराचवेळ सावधगिरीने वाट पाहून उदयने झुडूपात शिरण्याचा

निर्णय घेतला. हातानेच त्याने हरिहर पालीला जागच्या जागीच थांबण्याचा इशारा केला. आणि मागचा पुढचा विचार न करता तो बधडक छोटयाशा झुडूपात शिरला.

चंद्रप्रकाश अडण्याइतके ते झुडूप गर्द नव्हते. स्पष्टपणे त्याला दिसत होते. एकूण दोन प्रेते गडगडत जातानांही त्याला दिसली होती.

आता फक्त प्रश्न होता तो त्यांच्या तळाचा. ते दरोडेखोर आहेत याची खात्री त्याला पटली होती. एकदा का त्यांचे ठाण सापडले की अनेक गोष्टी त्याना करता येणार होत्या. बेलाशक त्यांच्यावर हल्ला करून त्याना गोंधळांत पाडता येणार होते.

उदयने आपल्या घोडीचा लगाम हातात घेतला आणि आजु-बाजूला शोध घ्यायला सुरुवात केली. दरोडेखोरांचे मुख्य ठाणे या दरीत नसावे याची खात्री त्याला झाली होती.

सूर्य वर आला तरीही दोघांची शोधाशोध चालूच होती. जेव्हा आपण वाट चुकलो आणि भलत्याच दिशेला आलो याची कल्पना आली, तेव्हा ते बावचळल्यासारखे झाले. अगदी समोरच त्याना चामुंडेच्या मंदीराचे शिखर दिसत होते.

एका वेगळयाच संशयाने उदयचे डोके भारले गेले. चामुंडेचा पुजारी त्याच्या डोळयापुढे उभा राहिला. आणि त्याच वेळी एका काटेरी झुडूपात अडकलेला पातळ कपडा त्याच्या नजरेने वेधला.

घोडयावरून उतरून अलगद हाताने त्याने तो कपडा काढला. कोणाच्या तरी ओढणीचा तो कपडा फाटलेला आहे, याची जाणीव त्याला झाली. तशाच रंगाची ओढणी त्याने रत्नाच्या अंगावर पाहिली होती. त्याचा संशय आता बळावत चालला होता...

कदाचित दरोडेखोरांचे ठाणे चामुंडेच्या देवळाभोवतीच असावे अशी एक शंका त्याच्या मनात उभी राहिली. पुजाऱ्या विषयीचा संशय उदयच्या मनातून दूर झाल्यामुळे त्याने चामुंडेचा संपूर्ण परिसर नजरेखाली घालण्याचा निश्चय त्याने केला होता.

दोन्ही घोड्याना सुरक्षित ठिकाणी बांधून दोघेही देवळाच्या रोखाने चालू लागले. आणि आपल्याकडे कुणी पहात नाही याची पहाणी करू लागले. उगाचच त्याच्या मनात धोक्याची जाणीव उभी राहिली होती. जितकी बाळगता येईल तितकी सावधगिरी देवळाच्या रोखाने जाताना तो बाळगीत होता.

देवळासमोर एक घोडा पाहून दोघेही आश्चर्याने थबकले. त्या घोड्याच्या पाठीवर असलेल्या कातडी थैलीत बंदुक होती. तलवार-देखील घोड्याच्या पाठीवरच लटकवण्यात आली होती. घोडा आणि ती हत्यारे पाहून उदयचे शरीर थरकले.

झुडूपात सापडलेला ओढणीचा तुकडा आणि देवळाच्या दारात थांबलेला घोडा याचा काहीतरी संबंध असावा, याची जाणीव त्याला झाली. आपण अगदी योग्यवेळी या ठिकाणी पोहोचलो. तो समाधा-नात एकेक पाऊल सावधगिरीने टाकीत तो पुढे सरकू लागला. केवळ नजरेच्या इशाऱ्यानेच त्याने काय करायचे ते हरिहर पालील सांगितले होते. अर्थात हरिहर पालीला काही सांगण्याची गरज नव्हती.

उदय प्रमाणेच कोणत्याही प्रसंगाला तोंड देण्याची त्याची सदैव तयारी होती. उदयच्या प्रत्येक हालचालीवर त्याचे लक्ष होते. वेडेपणाने त्याने कोणतीही हालचाल करू नये हीच हरिहर पालीची इच्छा होती.

दोघेही सावधगिरीने देवळाच्या पायऱ्यांजवळ दोन्ही बाजूला उभे राहिले. आणि त्याचवेळी घंटी बडवल्याचा आवाज त्यांच्या कानात शिरला. अनपेक्षितपणे तो आवाज आल्यामुळे ते दचकले होते पण जागचे हलले नाहीत.

थोड्याच वेळात पुजाऱ्याचा कठोर आवाज त्यांच्या कानात शिरला. आणखी कुणाचा तरी दबलेला आवाज त्याने ऐकला. आणि कुणीतरी सरदार कौल मागण्यासाठी देवळात आलेला आहे, याची

खात्री त्याला पटली.

कितीतरी वेळ दोघेही आतील दोघांचे बोलणे ऐकत होते. उदय ज्या कल्पनेने त्या ठिकाणी आला होता, त्या कल्पनेलाच धक्का बसला होता. पुजाऱ्याच्या भोवती फिरणारा त्यांच्या मनातील संशय आता नाहीसा होत चालला होता. सरदाराभोवती त्यांच्या संशयाचे वलय हळुवारपणे फिरू लागले होते.

सरदाराला निघून जाण्याची आज्ञा पुजाऱ्याने दिलेली आहे, हे ऐकू येताच दोघेही तिथून बाजूला झाले. परस्पर विरोधी बाजूला जाऊन त्याने झुडपांचा आश्रय घेतला. देवळाबाहेर येणाऱ्या धिप्पाड शरीराच्या सरदाराकडे उदयसिंह चौहान रोखून पहात होता. तो सरदार घाबरलेला आहे, हे दुरून त्याचा चेहरा पाहून उदयच्या लक्षात आले होते. ज्या दिशेने ते आले होते, त्याच दिशेने त्याला परत जाताना पाहून उदयने हरिहर पालीला खूण केली. हरिहर पाली जवळ येताच या सरदाराचा पाठलाग करण्याचा हुकूम त्याने सोडला.

'मी तुम्हाला कुठे भेटायचं?' हरिहर पालिने हलक्या आवाजात विचारले.

'भिल्लांच्या गावात. संताच्याच घरी मी रहाणार आहे.' उदयने शांतपणे हरिहरला सांगितले.

आणि हरिहर पाली सरदाराच्या मागे जाण्यासाठी निघाला. स्वत:ची काळजी घेण्याइतका तो समर्थ आहे, याची खात्री उदयला होती. म्हणूनच तो निश्चिंतपणे हरिहर पाली गेल्या दिशेलाच चालला होता, आपली घोडी ताब्यात घेण्यासाठी.

 



# दहा

धोलासिंग पवनार घाईघाईत आपल्या तळावर आला. आणि फार मोठा धक्का त्याला बसला. आपल्या तळावर एकच खळबळ माजलेली आहे, हे त्याच्या लक्षात आले.

गुहेच्या तोंडाशीच एकूण सात प्रेते ओळीने ठेवण्यात आली होती. ती सातही प्रेते आपल्याच माणसांची आहेत, हे त्याने पहाताक्षणीच ओळखले होते.

'काय झालं भोला ?' धोलासिंगाने कठोर आवाजात विचारले. त्याचा आवाज भीती आणि क्रोध या दोन्हीमुळे थरथरत होता. समोरची प्रेते पाहून त्याच्या मनावर फार मोठा जबर आघात झाला होता.

'आपल्या तळाकडे कुणीतरी येत होते. ते दोन घोडेस्वार होते. त्याना पकडण्यासाठीच मी याना दोन तुकड्यानी पाठवलं होतं.' भोलाने भीत भीत सांगितले आणि धोलासिंग पवनारचा चेहरा

क्रोधाने लालबुंद झाला.

'हे सर्व नालायक ठरले ?' धोलासिंग पुन्हा ओरडला. त्याची जळजळीत नजर भोलावर रोखली होती. केवळ दोन माणसानी आपल्या सात सहकाऱ्यांना ठार केले, हे त्याला पटण्यासारखे नव्हते. भोलाचे काहीतरी चुकले असावे, असेच त्याला राहून राहून वाटत होते.

भराभर त्याच्या तोंडून प्रश्न बाहेर पडू लागले. घाबरलेला भोला भीत भीत त्याच्या प्रश्नाची उत्तरे देऊ लागला. भोलावर डाफरण्यात आणि रागाचे प्रदर्शन करण्यात काहीही अर्थ नाही, याची कल्पना त्याला येऊन चुकली होती. आपण असतो तरी याहून अधिक काही करू शकलो असतो, हे त्याला पटले नाही.

चामुंडादेवीने दिलेला कौल त्याच्या विरुद्ध गेला होता. दैवी सामर्थ्यावर निस्सीम श्रद्धा असलेला भोला एकाएकी शांत झाला. हातातील माणसे गमावण्याऐवजी त्यांच्यातील धैर्य वाढवणे महत्वाचे आहे, याची जाणीव त्याला झाली.

आणि त्याचवेळी गोळीबाराच्या आवाजाने त्याने कान टवकारले. ज्यानी आपल्या सात सहकाऱ्याना ठार केले, ते कदाचित आपल्या तळाभोवती फिरत असावेत, अशी शंका त्याच्या मनात उभी राहिली.

'भोला, आजुबाजूला नीट लक्ष दे. गोळीबार कुणी केला, हे नीट पहा. कुणीही तळाजवळ येण्याचा प्रयत्न केला, तर त्याला बेलाशक ठार करा.' धोलासिंगाने कडक शब्दात हुकूम सोडला.

आणि परमेश्वराचे आभार मानूनच भोला तिथून बाजूला झाला. धोलासिंग पवनारच्या जवळ रहाताना देखील त्याची छाती धडधडत होती. काहीही घडण्याची शक्यता त्याला जाणवत होती.

धोलासिंग एकटाच आपल्या गुहेत जाऊन बसला. ओरडून त्याने दोन्ही स्त्रिया पळून गेलेल्या नाहीत याची खात्री करण्याचा

हुकूम सोडला. कोणतीही शंका मनात आली की, त्याच्या मनात उगाचच भीती निर्माण होत होती. मन भयभीत होऊन गेले होते,

कोणतीही सूचना न देता घाई घाईत भोला धोलासिंगच्या गुहेत शिरला तेव्हा त्याच्या चेहऱ्यावर भीती स्पष्टपणे दिसत होती.

'महाराज, एक घोडा आम्हाला सापडलेला आहे. आमच्या माणसानी गोळीबार करताच स्वार कुठेतरी पळून गेला.' भोलाने भीत भीत सांगितले. आणि स्वभावाप्रमाणेच धोलासिंग लगेच खवळला.

'गाढव, हे सांगायला तू मूर्खासारखा इथं आलास? आता काय, त्याला शोधायला मी जाऊ असं तू सांगणार आहेस?' धोलासिंगाचा आवाज बराच चढला होता.

'महाराज, आमची सर्व माणसं त्याच्या शोधात आहेत. आपल्याला कळावं म्हणून मी घाईघाईत आलो.'

'त्यानं काय झालं? त्याला शोधून काढा. या भागात एकदा का तो चुकला तर कुठेही जाणार नाही, दिसताच त्याला गोळी घाला, पण जिवंत सोडू नका.' धोलासिंगाने ओरडूनच भोलाला हुकूम सोडला.

आता कोणताही धोका पत्करण्याची त्याची तयारी नव्हती. आपल्या शत्रूला कोणतीही संधी मिळाली तर, आपला पराभव अटळ आहे, ही जाणीव त्यच्या मनात घर करून राहिली होती.

त्याचे माणूसबळ देखील कमी झाले होते. त्याची हुशार अशी माणसे ठार झाली होती. फक्त दोन माणसानी आपल्या सात सहकाऱ्याना ठार केले यावर त्याचा अद्यापही विश्वास बसत नव्हता.

भोला आपल्यापासून काहीतरी दडवीत आहे, हाच संशय त्याच्या मनात बळावत चालला होता.

रात्र जवळ आली. हळुहळू अंधार पसरला. समोर आणून दिलेल्या दशम्या खाण्याकडेही त्याचे फारसे लक्ष नव्हते. त्याच्या

डोक्यात घोडा सोडून पळून गेलेल्या माणसाचेच विचार घोळत होते. तो पोलिसांचा हेर असला, तर आपला सर्वनाश व्हायला वेळ लागणार नाही, याच विचाराचा गोंधळ त्याच्या मनात माजून राहिला होता.

हळुहळू रात्र वाढू लागली. मध्यरात्र उलटली, तरी त्याचा डोळा लागेना. सकाळ झाली तरीही तो जागाच होता. डोळे चुरचुरत होते, पण बंद होत नव्हते.

भोला पुन्हा त्याच्या गुहेत शिरला. भोलाचा चेहरा त्यावेळी समाधानाने झळकत होता.

'सापडला ?'

'नाही महाराज, पण तो कुठेही जाणार नाही.' भोलाने समाधानाच्या सुरात सांगितले.

'थोड्या वेळानं तूच येऊन सांगशील तो पळून गेला म्हणून.' धोलासिंगने चिडून सांगितले. भोला आपल्याला सांगायला आला नसता तर बरे झाले असते, असे त्याला वाटले.

सकाळ झाली, तरीही गेलेला भोला परत आला नव्हता. आणि ती अज्ञात व्यक्ती सापडल्याचेही त्याला समजले नव्हते. सूर्य माथ्यावर येताच भोलासिंग निघाला तेव्हा उन्हाने जमीन तापावी तसा तो तापला होता, आणि चिडलाही होता.

गुहेच्या मागच्या बाजूला असलेल्या खोलगट दरीत तो शिरलेला आहे, हे दबा धरून राहिलेल्या भोलाने सांगितले.

दरीत शिरलेला तो माणूस बाहेर पडू नये याची पूर्णपणे खबरदारी भोलाने घेतलेली आहे, याची खात्री धोलासिंगला पटली. उंदीर देखील बाहेर पळू लागला तर नजरेला येण्याइतका बंदोबस्त कडक होता.

धोलासिंग परत आपल्या गुहेत आला. संध्याकाळ उलटली,

रात्र संपली. तिसरा दिवस उजाडला. आणि धोलासिंगाची सहनशक्ती संपली.

दरीसारख्या दिसणाऱ्या आणि उतरताना काळजाचे पाणी पाणी करणाऱ्या त्या दगडाच्या खोबणीत शिरलेला माणूस अजून बाहेर येत नाही, हे धोलासिंगाच्या दृष्टीने असंभवनीय होते. कदाचित आपल्या माणसाना भास झाला असावा, आणि त्यांची पहाण्यात चूक झाली असावी असे धोलासिंगचे मत बनले.

'भोला, खाली उतरून पहा.' धोलासिंगाने कठोर आवाजात हुकूम सोडला. लगेच भोलाने ओरडून आपल्या सहकाऱ्याना हुकूम सोडायला सुरुवात केली, आणि त्याचवेळी भोलाच्या एका सहकाऱ्याची किंकाळी त्या शांत वातावरणात तीनचार वेळा प्रतिध्वनीत झाली. पोटात बाण शिरलेला तो दरोडेखोर गडगडत खाली खाली जात होता. त्याचे ओरडणे अद्याप संपलेले नव्हते.

धोलासिंग चरकला. वाट पहाण्याचा भोलाने घेतलेला निर्णय किती अचुक होता, याची कल्पना त्याला येऊन चुकली होती. पण दिलेला हुकूम मागे घेण्याची धोलासिंगाची रीत नव्हती.

बराचवेळ थांबून भोलाने स्वत: उतरायला सुरुवात केली. चोहोबाजूनी त्याचे सहकारी खाली सावधगिरीने उतरत होते. हातातील बंदुका आणि धनुष्यबाण सज्ज धरून ते खाली न्याहाळीत होते, आणि सावधगिरीने उतरत होते.

\+ +

उदयसिंह चौहानाच्या आगमनाने भिल्लांचा राजा अतिशय खूष झाला होता. या चौहानामुळेच दोनदा त्यांची वस्ती वाचली होती. चौहानाबरोबर अडीच तीन वर्षापूर्वी त्या वस्तीत आलेला गोरा साहेबदेखील चौहानाशी कसा अदबीने वागतो हे भिल्लांनी आणि भिल्लांच्या राजाने पाहिले होते.

दरोडेखोरीला आळा घालण्यासाठी त्या वस्तीतील भिल्लांना

देशोधडीला लावण्याचे गोऱ्या लोकांचे प्रयत्न हाणून पाडणाऱ्या चौहानाचे स्वागत फार मोठ्या प्रमाणात करण्यात आले.

संपूर्ण दिवस धामधुमीत गेला. रात्री बडी मेजवानी उदयसिंह चौहानाला देण्यात आली आणि बऱ्याच दिवसानी उदयने त्या रात्री शांत झोप घेतली.

'संता, मी अत्यंत महत्वाच्या कामासाठी आलो आहे.' उदयने सकाळी सकाळीच मूळ मुद्याला हात घातला. हे भिल्ल शब्द दिला तर शब्दाप्रमाणें वागणारे, आणि अत्यंत प्रामाणिक असतात, याची खात्री असल्यामुळेच त्यानी संताला विश्वासात घेतले होते.

उदयसिंह चौहान बराचवेळ बोलत होता. संता आणि संताच्या मुलाच्या चेहऱ्यावरील भाव क्षणा क्षणाला बदलत चालले होते.

'महाराज, आपण सांगता तशी एक बाई माझ्या दोन माणसांना भेटली होती. ती घाबरली होती. तिला मदत करावी म्हणून तिला माझ्याकडे आणीत असताना अचानक कुणीतरी हल्ला केला. माझी दोन्ही माणसं घाबरली आणि हल्लेखोरांच्या हातून सुटण्यासाठी तिथून पळाली.'

'मग तिचं काय झालं?' उदयने गंभीरपणे विचारले.

'त्या लोकानी तिला पळवून नेलं.'

'ते कोण होते, माहित आहे?'

'नाही, ते दरोडेखोर असावेत.' संता खेदाने म्हणाला. उदयसिंह चौहानाना आपण मदत करू शकलो असतो तर बरे झाले असते, असेच संताला वाटत होते. निदान उपकारांचे ओझे थोडे तरी कमी होईल असाच विचार तो करीत होता.

'संता, तुझा एकदा हुशार माणूस मला देशील?'

'जरूर.' संता खूष होऊन बोलला.

'असा माणूस दे संता की, या भागाची त्याला खडानखडा माहिती हवी. दऱ्याखोऱ्यांची कल्पना हवी. रात्रीच्या अंधारातदेखील

त्यानं वाट चुकता कामा नये.' उदयने गंभीर आवाजात आपली मागणी सांगितली.

'महाराज, मी स्वतः येईन.' संताच्या मुलाने खूष होऊन सांगितले, आणि उदयने चमकून त्याच्याकडे पाहिले. ओठावर मिसरुड देखील न फुटलेला तो तरुण धोक्याची जाणीव दिली असताना देखील मदत करायला तयार झाला होता. तो कुशल योद्धा आहे आणि अव्वल दर्जाचा तिरंदाज आहे हे उदयसिंह चौहानाला माहित होते.

फारसा वेळ न लावता दोघेही निघाले. उदयनें आपला घोडा वाड्यावरच ठेवला होता. घोडा घेतला तर आपणाला लपून छपून जाता येणार नाही, ही संताच्या मुलाची सूचना उदयने मानली होती.

अत्यंत अवघड अशा भागातून दोघेही चालले होते. दरोडेखोरांशी आपली चकमक कुठे झाली हे उदयने पूर्वीच सांगितले असल्यामुळे त्या सर्व भागाचे चित्र रामाच्या डोळ्यांपुढे आले होते.

सूर्य माथ्यावर तळपू लागला आणि दोघेही एका गुहेत शिरले. कोणेकाळी जमिनीखालून वहाणारा झरा आता आटला होता. आणि आपोआपच ती एक नैसर्गिक गुहा तयार झाली होती. आतून चालताना उदय ठेचाळत होता. पण रामवर मात्र त्याच्या कोणताही परिणाम झाला नव्हता. पायाखालच्या वाटेवरून चालावे तसा तो त्या भुयारातून वाकून चालला होता.

बराचवेळ ते चालत होते. एखाद्या दरोडेखोराला दडायला अशा गुहेसारखी दुसरी जागा शोधूनही सापडायची नाही, हे उदयने ओळखले होते. राम आपल्याला योग्य मार्गाने नेत आहे, याची खात्री पटली होती. आणि निश्चिंतपणे तो चालत होता.

आणि त्याचवेळी भुयारात देखील अस्पष्टसे गोळीबाराचे आवाज त्याच्या कानात शिरत होते. एक अस्पष्टशी किंकाळी देखील

त्याच्या कानावर येऊन पडली होती..

काहीतरी गडबड आहे, हे उदयच्या लक्षात आले आणि रामला त्याने घाई करण्याचा इशारा केला, त्यांचे बोलणे देखील आता बंद झाले होते.

अस्पष्टसा उजेड दिसू लागला, आणि अधून मधून झाडल्या जाणाऱ्या गोळयांचा आवाज स्पष्टपणे त्यांच्या कानात शिरू लागला. एक गोळी तर आपल्यापासून अगदी जवळूनच झाडली गेली हे त्याच्या लक्षात आले.

रामला मागेच ठेवून उदय सावधगिरीने पुढे झाला आणि दगडांच्या कपारी आड दडलेला हरिहर पाली त्याला दिसला. अगदी चिंचोळया वाटेंतून आपण बाहेर जाऊ शकू की नाही, याचाच त्या वेळी उदय विचार करीत होता, त्या भुयाराची रामला चांगल्या रितीने माहितो आहे, याची कल्पना उदयला आली.

रामने उदयचा हात धरून त्याला एका अरुंद अशा कपारीतून कुठेतरी नेले. आणि आठदहा पावले टाकताच आपण गर्द अशा झुडू-पात आलो आहोत, याची कल्पना उदयला आली, आणि आपल्या पासून अगदी जवळच हरिहर पाली बसलेला आहे, हे त्याने ओळखले.

हलक्या आवाजात उदयने हरिहर पालीला हाक मारली. चकीत झालेला हरिहर पाळी घाईघाईत त्या झुडुपात शिरला आणि फारसा वेळ न गमावता त्याला घेऊन उदय भुयारात शिरला.

' हरिहर, तू या भुयारातून खाली येणाऱ्यावर लक्ष ठेव आम्ही दोघेही वरुन हल्ला करणार आहोत. या भुयारात शिरण्याचा कुणी प्रयत्न केलाच तर त्याला उडव. नाहीतर तुझी चाहूल देखील त्याना दाखवून देऊ नकोस. ' उदयने स्पष्ट शब्दात सूचना दिली. आणि रामला घेऊन घाईघाईत तो मागे फिरला.

अगदी जवळच्या मार्गाने त्या ठिकाणी नेण्याचे आश्वासन

रामने उदयला दिले होते.

हरिहर पाली घेरला गेलेला आहे, याची कल्पना उदयला आली होती. त्याच्यावर हल्ला करणारे दरोडेखोरच आपल्याला हवे ते आहेत, याची कल्पना उदयला आली होती. आणि सरळ सरळ एकेकाला कंठस्थान घालण्याचा निश्चय त्याने केला होता.

 



## अकरा

सरदाराचा पाठलाग करीत आलेला हरिहर पाली सरदाराला वास देखील न लावता ज्या ठिकाणी पूर्वी चकमक झडली होती, त्याच ठिकाणी परत आला. आणि त्याच्या मनातील संशय जागृत झाला.

घोडा वाटेतच ठेवून त्याने थेट गुहेपर्यंत त्याचा पाठलाग केला होता, आणि इतक्यातच धोका पत्करणें आपल्याला परवडणारे नाही, हे लक्षात घेऊन मागल्या पावलीच परत फिरला होता.

सूर्य पश्चिमेला झुकला, अंधार झाला तरीही तो सभोवतालची पहाणी करतच होता. पुजाऱ्याने सरदार म्हणून ज्याचा उल्लेख केला होता, तो दरोडेखोरांचा सरदार असावा, याची खात्री त्याला पटली होती. गुहेच्या सभोवताली पेरलेले पहारे त्याने हेरले होते.

मध्यरात्रीच्या सुमारास तो आपल्या घोड्याजवळ आला. घोड्याजवळ येतानाच अस्पष्टशी हालचाल त्याने पाहिली होती.

सावधगिरी बाळगण्याची सवय झाल्यामुळेच तो जागच्या जागी थबकला होता. कुणीतरी पलिकडच्या बाजूला आहे, याची खात्री त्याला झाली होती.

सावकाश तो लपूनछपून पुढे सरकला. पाठीवर बांधलेली दश-म्यांची थैली त्याने चाचपून पाहिली. पाठीवरचा बाणांचा भाता पाहिला. आणि आपण जीव तोडून धावलो तरी, खांद्यावरचे धनुष्य पडणार नाही, याची खात्री त्याने केली. हातातील बंदुक मात्र त्याने जय्यत तयारीत पकडली होती.

पुढे जावे की जाऊ नये, याचा विचार करीत तो क्षणभर थब-कला आणि त्याचवेळी कुणीतरी त्याच्याकडे पाहून ओरडले. खरा धोका आपल्याला आता आहे, याची कल्पना त्याला आली. आणि तसाच तो माघारी फिरला.

दरोडेखोरांना चुकवण्यात त्याने यश मिळवले होते. झाडा-झुडपांचा आसरा घेत तो गुहेच्या मागच्या भागात दडून बसला होता. एका जागी बसणे त्याला परवडण्यासारखे नव्हते.

सूर्याने डोके वर काढले. आणि तोही दडलेल्या भागातून वर आला. सभोवताली पहात तो गुहेच्या रोखाने चालू लागला. आणि त्याचवेळी गोळीचा एक दणका त्याच्या कानात शिरला. सणसणत एक गोळी त्याच्या डोक्यावरून निघून गेली.

दरोडेखोरानी आपल्याला पाहिलेले आहे, याची कल्पना त्याला आली. वेड्यावाकड्या उड्या घेत आणि दगड कपारींचा आसरा घेत तो मागे मागे जाऊ लागला. आपण खोल आणि गोलाकार अशा जमिनीच्या खोबणीत शिरत आहोत, याची कल्पना त्याला आली होती. दरीसारख्या त्या खोबणीत पाहून त्याचे शरीर शहारून गेले होते. अनेक दरोडेखोरानी समोरून एकदमच हल्ला केला तर आपण स्वतःला वाचवू शकणार नाही, याची खात्री त्याला झाली होती. आपल्यावर सतत दरोडेखोरांचे लक्ष आहे, आणि त्या भागातून आपल्याला बाहेर

पडू देत नाहीत, याची खात्री त्याला पटली होती.

आणि म्हणूनच तो जास्तीत जास्त सावध रहाण्याचा प्रयत्न करीत होता. जोपर्यंत दरोडेखोरांचा कावा लक्षात येत नाही, तोपर्यंत कोणतीही हालचाल करणे धोक्याचे आहे, या समजुतीने कसाबसा तो खोबणीत शिरला होता. आणि एका दगडाच्या कपारीत आश्रयाला थांबला होता.

सूर्य पश्चिमेकडे किंचित झुकला. आणि कुणीतरी खाली उतरत आहे, याची जाणीव त्याला झाली. तोंडात दशमीचा तुकडा घालूनच त्याने धनुष्याला बाण लावला. बाण सुसाटत त्याच्यापासून वेगळा झाला. आणि एक जीवघेणी किंकाळी त्याच्या कानात शिरली.

बाण अचुक लागला होता. एक दरोडेखोर ओरडत आणि गडगडत खाली येताना त्याला दिसत होता.

पुन्हा शांतता पसरली. थोडावेळ तसाच गेला. समोर धोका दिसत असतानाही दशम्या खाण्याचे त्याचे काम चालूच होते.

वरून जेव्हा गोळीबाराला सुरुवात झाली. आणि चारी बाजूनी दरोडेखोर खाली उतरताना त्याला दिसले, तेव्हा घाईघाईत दशम्यांचे बोचके त्याने पाठीला बांधले.

खाली उतरणाऱ्याना आणखी थोडे खाली उतरू द्यायचे आणि एकेकाला उडवायला सुरुवात करायची असा बेत त्यांने आखला होता. सर्वांत खाली आलेला उजव्या बाजूचा दरोडेखोर त्याने बेला-शक गोळीने उडवला. आणि त्याच वेळी वरून होणारा गोळीबार थपकन् थांबला. आणि वरून इतका तुफान गोळीबार होत असताना देखील आपण वाचलो कसे, हेच आश्चर्य त्याच्या डोळ्यांपुढे उभे राहिले.

खाली येण्याचे दरोडेखोरानी थांबवले होते. जमिनीला टेकून ते पडून राहिले होते. बराचवेळ काहीही घडले नाही.

एकाएकी तो दचकला. त्याच्या स्वत:च्या कानावरच विश्वास

बसला नाही. अगदी जवळून उदयसिंह चौहानाचा आवाज कानात शिरला होता. क्षणभर त्याचा विश्वासच बसला नाही, आपल्याला कदाचित भास झाला असावा अशी त्याची समजूत झाली. आणि दुसरी हाक कानावर पडताच त्याने मागे वळून पाहिले. एका झुडपात उदयसिंह चौहान आणि एक भिल्ल तरुण असे दोघे उभे होते. आणि जवळ येण्याविषयी त्याला खुणवत होते.

उदयला पहाताच त्याच्या मनावरचे दडपण कमी झाले. त्यांच्या बरोबर तो भुयारात शिरला. गर्द झाडीत दडलेले ते भुयाराचे तोंड आपल्याला शोधूनही सापडले नसते, याची खात्री पालीला झाली. आणि जेव्हा उदयचे मोक्याची जागा दिली तेव्हा तो आणखीनच खूष झाला. खाली आलेल्या एकेका दरोडेखोराला टिपून मारण्याचा निश्चय त्याने केला होता.

उदयसिंह त्या भिल्लाला घेऊन निघून गेला, आणि हरिहर पाली एकटाच त्या भयाण जागेत बसून राहिला. कमी झालेल्या उजेडावरून सूर्य बुडण्याच्या बेतात आहे, हे त्याच्या लक्षात आले. गुहेत आपण एकटेच आहोत या जाणीवेने उगाचच त्याचे शरीर शहारले. हळुच तो आपल्या जागेवरून उठला, आणि गुहेबाहेर पडून झाडीत जाऊन बसला.

आपल्यापासून अगदी जवळच झालेली कुजबुज त्याच्या कानात शिरली. झुडूपाबाहेर पडून पहाण्याचे धैर्य त्याला झाले नाही. कारण, आपला शत्रू कुठवर आला असावा याची निश्चित कल्पना त्याला आली नव्हती. अंधार पडला तरी काहीच घडले नव्हते.

बसल्या जागेवरून झटक्यात तो उठून उभा राहिला. एका किंकाळीने शांततेचा भंग केला होता. ओरडून कुणीतरी दुसऱ्याला हुकूम करीत असल्याचे त्याच्या कानात शिरले होते. आणि तो उदय सिंह चौहान नाही, याची खात्री त्याला पटली होती.

सावधगिरीने तो तसाच उभा राहिला. संपूर्ण दिवस त्याने

त्या खोबणीत काढला होता, रात्रही इथेच काढावी लागेल, असे चिन्ह त्याला दिसत होते. आणि झालेही तसेच.

संपूर्ण रात्र गोगलगाईच्या पावलांनी पुढे गेली, आणि सूर्य उजाडण्याची वेळ आली असतानाच वरुन मारलेली उदयसिंह चौहा-नाची हाक त्याच्या कानात शिरली.

× + ×

भुयारांतून बाहेर पडता पडता उदयसिंह चौहान संताच्या मुलाकडून भरपूर माहिती मिळवत होता. या भागात भरपूर भुयारे आहेत, हे त्याने रामच्या तोंडूनच ऐकले होते. आणि म्हणूनच उदयचे कुतुहल जागृत झाले होते.

अगदी जवळच्या मार्गाने जेव्हा आपल्याला मोठ्या भुयारात नेण्याची उदयने त्याला सूचना केली तेव्हा त्याच भुयाराला असलेल्या एका अरुंदशा फाट्याचे तोंड त्याने शोधून काढले. ते भुयार अत्यंत अवघड असे होते, काही काही ठिकाणी तर गुढग्यांवरून सरपटत निघून जावे लागत होते.

ते भुयार सरळ रेषेत न जाता गोलाकार फिरत गेलेले आहे, हे उदयच्या लक्षात आले.

भुयार वरच्या बाजूला चढत गेले होते. आपण वर वर जात आहोत हे त्याला स्पष्टपणें दिसत होते.

जेव्हा दोघेही थकले, तेव्हा घाबरून बोलतानाचा एका स्त्रीचा आवाज त्याच्या कानात शिरला. उदय जागच्या जागी थबकला. जवळच कुठेतरी स्त्रिया आहेत, हे त्याने ओळखले. एकवार त्या कैदी असाव्यात किंवा दरोडेखोरांच्या बायका असाव्यात हा विचार करून त्यानें कानोसा घ्यायला सुरुवात केली.

बोलण्याचा आवाज अगदी जवळच ऐकू येत होता. त्या स्त्रिया कोण आहेत, हे त्याला पहायलाच हवे होते. कोणताही विचार न करता तो मशालीच्या उजेडात आवाजाच्या दिशेनें जाणाऱ्या भुयारांत

शिरला. आणि दोन स्त्रियाना पाहून जागच्या जागी थबकला. दोघीही कैदी आहेत हे पहाताक्षणीच उदयच्या लक्षात आले.

हाताच्या इशाऱ्यानेच त्याना न बोलण्याची सूचना केली. आणि दोघीही मुकाट्याने एका कोपऱ्यात उभ्या राहिल्या. काळचाकभिन्न रामला पाहून त्यांची भीती अधिकच वाढली.

आणि त्याचवेळी त्यांचा आवाज ऐकून तलवार उपशीतच एक दरोडेखोर आत शिरला. सपकन् तलवारीचा वार त्याने सरळ सरळ उदयवर केला.

पण त्याचा तो वार हवेतच फिरला. आणि दुसऱ्याच क्षणी तो रक्ताच्या थारोळयात पडून लडबडू लागला.

त्याची मान अर्धी तुटली होती. रामने केलेला वार वेगवान आणि अचुक होता.

थोडयाच वेळात दोघानीही संपूर्ण भुयार पालथे घातले. उदय आणि राम या दोघानी एकूण पाच दरोडेखोराना ठार केले होते.

आणि दोन्ही स्त्रियाना धीर देऊन त्याना स्वत:बरोबर भुयाराबाहेर काढले होते. बहुतेक दरोडेखोर हरिहर पालीच्या मागे गेले असावेत, हे त्याला समजून चुकले होते. आणि त्यानाच गाठण्याचा निश्चय उदयने केला होता.

आणि थोडयाच वेळात रामजवळच्या बाणाने खबदाडीच्या तोंडावर हरिहर पालीवर पहारा करणाऱ्या एका दरोडेखाराला त्याने उडवले होते. त्यांची दिशाभूल केली होती.

❑



## बारा

धोलासिंग पवनार बावचळल्या सारखा खोल दरीत पहात उभा होता. ज्याला आपल्या माणसानी घेरलेले आहे, तो सामान्य नाही, याची कल्पना त्याला येऊन चुकली होती.

भोळाने सांगितलेले त्याला पटले होते. केवळ दोन माणसानी आपल्या सात माणसाना ठार केले, हे उघड सत्य आता त्याच्या डोळ्यांपुढे नाचू लागले होते.

आपला खाली उतरलेल्यातील एक सहकारी ठार झाला हे जेव्हा त्याच्या लक्षात आले, तेव्हा तो अधिकच बेचैन झाला. मनावर पडलेला ताण क्षणाक्षणाला वाढतच गेला. आणि काही झाले तरी त्याला जिवंत सोडायचे नाही, ही ईर्षा पुन्हा एकदा त्याने मनाशी बांधली.

आपल्या माणसाना सावधगिरीचा कोणताही इशारा त्याने केला नाही. पण तो जिवंत सुटता कामा नये, हेच सध्या त्याचे ध्येय

होते.

अंधार पडला. पडलेला अंधार सरसरत गेला. तरीही जागचे हलायला त्याला मन झाले नाही, केव्हा एकदा त्या माणसाचे प्रेत आपल्या समोर येते, असे त्याला होऊन गेले होते. विचारांच्या आणि बेचैनीच्या तंद्रीत असतानाच दरीच्या अगदी वरच्या टोकाला अस्पष्टशी किंकाळी त्याने ऐकली.

अंधाराचा फायदा घेऊन वर चढला असावा, अशी शंका त्याच्या मनाला चाटून गेली. त्याने आजुबाजूला पाहिले आणि हलक्या आवाजात भोलाला हाक मारली. घाईघाईत भोला त्याच्या जवळ आला.

'भोला, काय झालं असावं ?'

'काही समजत नाही महाराज, कदाचित तो वर आला असावा.' भीत भीत भोलाने सांगितले. आणि दोघांचेही तर्क सारखेच आहेत याची जाणीव होताच तशाही परिस्थितीत तो खूष झाला. इतक्या वर जर तो आला असेल तर कोणत्याही परिस्थितीत आपल्या हाती सापडणार नाही, याची जाणीव त्याला झाली.

अन्नाविना मरण्याऐवजी आपण लढता लढता मेलेले बरे असा विचार करून कदाचित तो माणूस आपल्या सहकाऱ्याची नजर चुकवून वर आला असावा, याची खात्री आता त्याला पटली.

'भोला, सर्वांना वर यायला सांग.' धोलासिंगाने गंभीर आवाजात आणि हलक्या सुरात हुकूम सोडला. त्याच्या आवाजात चिंता भरली होती. इतक्या शांतपणे, विचारपूर्वक धोलासिंगाने यापूर्वी कधीच हुकूम सोडल्याचे भोलाला तरी आठवत नव्हते. कारण नसताना त्याच्या मनात भीतीने थैमान सुरू केले.

'महाराज, त्याला सोडायचा.'

'हो, तो आपल्याला सापडणार नाही, भोला, आम्हाला मध्यरात्रीपूर्वी ही जागा सोडायला हवी,' त्याच्या आवाजात ठाम निश्चय होता.

भोलाने भराभर हुकूम एकाकडून दुसऱ्याकडे पोचवायला सुरुवात केली, थोडयाच वेळात सर्वजण गुहेच्या तोंडाशी जमले. आपली एकंदर तीस माणसे, या एकाच माणसाने ठार केल्याचे घोलासिंगाच्या लक्षात आले होते.

यदाकदाचित आत शिरलेला माणूस, परत गेलाच तर ताबडतोब आपल्यावर हल्ला होण्याची शक्यता त्याला वाटत होती. सर्व सामानाची आवराआवर करून आपण दिवस उजाडण्यापूर्वी निघू की नाही याची देखील त्याला शंकाच होती.

'भोला, तो पोलिसांचा खबऱ्या असावा.' घोलासिंग शांतपणे बोलला.

'असावा महाराज.'

'त्याने खबर देताच पोलिसाची धाड इथपर्यंत येईल.'

'होय महाराज.'

'मला वाटतं ती रात्रीची येईल.'

'होय महाराज.'

'चल, इथून हलण्याची तयारी करण्याचा हुकुम दे.' भोलाने त्याला शांतपणे सांगितले. आणि भोलाने भराभर हुकूम सोडायला सुरुवात केली.

आणि थोड्याच वेळात संपूर्ण गुहेत एकच गोंधळ सुरू झाला. नेमके काय झाले हे प्रथम घोलासिंगाच्या लक्षात आले. नाही. जेव्हा घाबरलेला भोला त्याच्यासमोर येऊन उभा राहिला तेव्हा घोलासिंग चिडला होता.

'महाराज, घात झाला.

'काय?' घोलासिंग खवळला.'

'आपली पाच माणसं आत ठार झालीत.'

'कशी?'

'माहीत नाही महाराज. दोघीही त्या ठिकाणी नाहीत.'

## क्ष म स्व !

प्रिय वाचक,

पुस्तकांसाठी वापरण्यात येणाऱ्या कागदाची टंचाई निर्माण झाली असल्याने पूर्वी जाहीर केलेली या महिन्याची

## सागर व शार्क

ही सागर कथा प्रसिद्ध होऊ शकली नाही, याबद्दल दिलगीर आहोत. ही कथा जानेवारी ७४ मध्ये प्रसिद्ध होईल.

—व्यवस्थापक

भोलाच्या तोंडून शब्द बाहेर पडला आणि धोलासिंग सुन्न होऊन भोलाकडे पहातच राहिला. चामुंडादेवीचा कौल त्याच्यापुढे उभा राहिला.

आणि त्याच्या डोळ्यांपुढे चामुंडेचा पुजारी उभा राहिला. त्या पुजाऱ्याचे शब्द उभे राहिले. कदाचित त्याचेच तर हे काम नाही ना, अशीही शंका त्याच्या मनात उभी राहिली.

चामुंडेच्या देवळातून बाहेर पडताना त्या पुजाऱ्याला आपल्या-विषयी काहीतरी माहिती असावी असे त्याला वाटत होते. आता ते धोलासिंगाच्या मनात पक्के ठसले गेले होते. उभा पेटला होता तो. सर्वनाशच व्हायचा असेल, तर त्या त्याच्या दृष्टीनें दुष्ट पुजाऱ्याला जन्माचे शासन करूनच स्वतःचा सर्वनाश होताना पाहणार होता.

जी बाई पळताना खाली पडून मेली होती, तेव्हा तो आपल्याला पकडायला धावत येत होता, हे सापडलेल्या स्त्रीने सांगितले होते. काहीतरी गौडबंगाल चामुंडेच्या देवळात चालू आहे, याची खात्री त्याला झाली होती.

आणि उजाडताच एकूण बारा हत्यारबंद दरोडेखोर चामुंडेच्या रोखाने निघाले होते. अग्रभागी स्वतः धोलासिंग होता.

सर्वजण चामुंडेच्या आवारात आले. धोलासिंगाने गर्जूनच चामुंडेच्या पुजाऱ्याला हाक मारली. देवळात काहीतरी हालचाल धोलासिंगाला दिसली. पुजारी बाहेर येतो आहे. याची कल्पना त्याला झाली.

आणि शांतपणे एक बावळट चेहऱ्याचा तरुण दोन्ही हात छातीवर बांधलेल्या अवस्थेत सावकाश पायऱ्या उतरून खाली आला. त्याच्याकडे कोणतेही हत्यार नव्हते. धोलासिंगापासून दहापंधरा हातावरच तो उभा राहिला.

'तू कोण ?' धोलाने चिडून विचारले.

'उदयसिंह चौहान.' शांतपणे त्या तरुणाने उत्तर दिले. आणि धोलासिंग त्याच्याकडे पहातच राहिला. तो हादरला होता. यापूर्वी त्याने हे नाव ऐकले होते. चौहानाची धिप्पाड मूर्ती त्याच्या डोळ्यांत यापूर्वी होती.

'तुला काय हवं ?' तरीही धीर करीत धोलासिंगाने चिडून विचारले.

'तू हवास, धोलासिंग, स्त्रियांवर हात उगारणारा आणि त्यांना पळवणाऱ्यांना आतापर्यंत मी देहांताचं शासन केलेलं आहे.' उदयसिंह चौहानाच्या तोंडून कठोर शब्द बाहेर पडले आणि त्याच-वेळी धोलासिंगाची म्यानातील तलवार सपकन बाहेर पडली.

'चौहान, तुला माझ्या हातानी ठार करणार आहे. तुझ्या-बरोबर या देवळाच्या पुजाऱ्यालाही.' धोलासिंग चवताळून बोलला आणि त्याने घोड्यावरून उडी घेतली.

स्वतःच्या मनगटावर धोलासिंगाच्या जबरदस्त विश्वास होता. आपल्या हाताखालच्या माणसानाही पराक्रम दाखवण्याची संधी त्याला गमवायची नव्हती. दरोडेखोरांचा महान शत्रू तो स्वतःच्या हातानी ठार करणार होता.

उदय शांत होता. देवळाच्या दारातून आणखी एक व्यक्ती हातात तलवार घेऊन येताना पाहून मात्र धोलासिंग थक्क झाला. जिला आपण पटणीच्या डॉक्टरांच्या घरून पळवले होते, आणि ठार झाली असे समजत होतो, तीच ती तरुणी होती.

शांतपणे तिनें उघडी तलवार उदयच्या रोखाने भिरकावली. पाहता पाहता उदयने ती झेलली होती, आणि तलवार झेलण्याची पद्धत पाहूनच धोलाचा अर्धा धीर खलास झाला होता.

एकाएकी धोलाने खांद्यावरची बंदुक हातात घेतली आणि उद-यच्या रोखाने गोळी झाडली. त्याचा नेम अगदी अचूक होता. पण

चौहानाने तो किंचित बाजूला सरकून गोळी चुकवली होती.

धोलासिंग आणि मदतीला धावलेला मौला क्षणात खाली रक्ताच्या थारोळ्यात पडले होते. द्वंद्व वाढवायची उदयची इच्छाच नव्हती. बाकीचे दरोडेखोर हादरले होते.

\+ \+ \+

उदयसिंह चौहान आणि रत्ना एकाच घोड्यावर बसून निघाली, तेव्हा त्यांच्याबरोबर हरिहर पाली देखील होता. स्वत: संता आणि पुजारी त्याना हात हलवून निरोप देत होते.

 

( स मा प्त )